# अनुक्रमणिका.

## परिशिष्टें—

### परिशिष्ट (अ)



### परिशिष्ट (ब)

# निवेदन

'महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ, उज्जयिनी' या संस्थेचें पहिलें प्रकाशन म्हणून "मालविका" हा काव्यसंग्रह प्रसिद्ध करण्यांत येत आहे. महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ ही संस्था स्थापन होऊन आज चार वर्षें झालीं; एवढ्या अवधींत उज्जयिनी येथील महाराष्ट्रीय मंडळींत मराठी वाङ्मयासंबंधीं अभिरुची उत्पन्न करण्याचें कार्य मंडळानें उत्तम रीतीनें बजाविलें असें निःसंदिग्ध-पणानें म्हणावयास हरकत नाहीं. उज्जयिनीचा प्राचीन इतिहास कितीही उज्वल असला तरी आज तिचें महत्व एक धार्मिक क्षेत्रस्थान व उदयोन्मुख नगरी इतकेंच आहे. येथील व्यवहाराची भाषा हिंन्दी असल्यामुळें व महाराष्ट्रीय लोकसंख्या अल्प अस-ल्यामुळें मराठी वाङ्मयासंबंधानें या ठिकाणीं कांहीं आस्थापूर्वक कार्य होऊं शकेल याचीं कल्पना पूर्वीं नव्हती. परंतु कांहीं प्रसं-गानें महाराष्ट्रीय मंडळी एकत्र होऊं लागली व "महाराष्ट्र वाङ्मय मंडळ" ही संस्था अस्तित्वांत आली. या संस्थेच्या कार्याविषयीं आम्हीच गौरवपूर्ण बोलणें व लिहिणें अप्रशस्त होईल. "न तद्वाच्यं वधूबंधुभिः" या न्यायानें या बाबतींत मूक वृत्ती धारण करणेंच इष्ट आहे. बृहन्महाराष्ट्रांत पसरलेल्या

अशा संस्थांचा मुख्य उद्देश वाङ्मयानिर्मिति करणें हा असूं शकत नाहीं तर काव्यशास्त्रविनोदाच्या निमित्तानें एकत्र होऊन जीवित सुखमय करणें व त्या बरोबरच महाराष्ट्र-शारदेची होईल ती सेवा करणें हा असतो. आजपर्यंत या संस्थेस श्री. तात्यासाहेब केळकर ( पुणें ), श्री. दादासाहेब करंदीकर (सातारा), श्री. माधवराव किबे ( इंदूर ), श्री. दाजीसाहेब आपटे ( बडोदें ), प्रो. द. वा. पोतदार ( पुणें ), प्रो. मा. दा. अळतेकर ( मुंबई ), इत्यादि मंडळींनीं आमच्या विनंतीवरून भेट दिली आहे व मंडळाच्या कार्यांत भाग घेऊन त्याविषयीं प्रेमळ सहानुभूति प्रगट केली आहे.

मध्यभारतांत राहणाऱ्या कवींचा प्रातिनिधिक स्वरूपाचा काव्यसंग्रह उपलब्ध नसल्यामुळें तशा प्रकारचा कांहीं प्रयत्न करावा अशी कल्पना मनांत आली व मंडळाच्या उत्साही सभासदांच्या मदतीनें अदमासें सहा महिन्यांच्या अवधींत तिला हें मूर्तस्वरूप आलें. ‘ महाराष्ट्र शारदा ’ ‘ विदर्भ वीणा ’ इत्यादि संग्रहांवरून ज्याप्रमाणें खास महाराष्ट्रांतील आधुनिक काव्याचें स्वरूप ध्यानांत येतें त्याप्रमाणें “ मालविका ” या काव्यसंग्रहावरून मध्यभारतीय महाराष्ट्रीयांच्या काव्याचें स्वरूप चांगल्या रीतीनें ध्यानांत येईल असें म्हणावयास हरकत नाहीं. या काव्य-संग्रहाची जुळणी होत असतांना एक गोष्ट स्पष्टपणें नजरेस आली ती ही कीं मध्यभारतांत कवि-प्रतिभेची उणीव नाहीं. आजपर्यंतचें

कार्य यदृच्छेनेंच झालेलें आहे; अनुकूल वातावरण निर्माण केल्यास तीं अधिक कार्यक्षम होईल यांत यत्किंचित् सुद्धां शंका वाटत नाहीं.

हा काव्यसंग्रह मूर्त स्वरूपांत बाहेर पडण्यांत अनेकांचे श्रम कारणीभूत झालेले आहेत, तरी तो या स्वरूपांत बाहेर आणण्याचें मुख्य श्रेय संपादकांनाच दिलें पाहिजे. " एकमेकां साह्य करूं,अवघें धरूं सुपंथ " हाच सिद्धांत सर्व काम करणाऱ्या मंडळींच्या ध्यानीं होता. त्यामुळें पत्रव्यवहार करण्यापासून तों मुद्रितें तपासण्यापर्यंतचें सर्व काम बिनबोभाट पार पडलें. यांत बाहेरची सहानुभूति व मदत यांची भर पडली व म्हणूनच हा काव्यसंग्रह प्रस्तुत स्वरूपांत व संकल्पित काळांत प्रकाशित होऊं शकला.

या संग्रहांत महाराष्ट्राला सुपरिचित व अपरिचित अशा दोन्ही प्रकारच्या कवींच्या कविता आल्या आहेत. तांबे, डांगे, कुळकर्णी, देव, काळेले, आपटे, कृष्णाबाई वैशंपायन, कवचाळे, प्रभृति कवींचा महाराष्ट्राला चांगला परिचय आहे. परंतु लोवलेकर, माचवे, बाळ पेंढरकर, करकरे, शिंत्रे, सौ. इंदिराबाई सोहनी, पंडित इत्यादि नूतन कवींच्या कविता यांत आहेत हाच या संग्रहाचा विशेष होय. ह्या उदयोन्मुख कवींचा परिचय 'मालविके ' च्या द्वारें करून देण्यांत आम्हांस आनंद व अभिमान वाटत आहे. श्री. तांबे यांच्या बहुतेक कविता महाराष्ट्रीय वाच-

कांना परिचित असल्या तरी, या संग्रहांतील " पूर्णाहुति " ही कविता प्रथमच प्रसिद्ध होत असून 'मालविकेचा' तो बहुमोल अलंकार आहे.

ज्या ज्या कवींनीं आमचीं पत्रें जातांबरोबर आपल्या कविता ताबडतोब पाठवून आम्हांस आमच्या अंगीकृत कार्यांत मदत देऊन प्रोत्साहित केलें त्या सर्वांचे व्यक्तिशः आभार पत्रद्वारें पूर्वीच मानिले आहेत; मध्यभारतीय किंबहुना महाराष्ट्रीय कवींत वयानें, मानानें, व योग्यतेनें श्रेष्ठ असणारे श्री. तांबे यांनीं आमच्या विनंतीस मान देऊन आपलेपणानें अल्पावधींत सुंदर प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. मुखपृष्ठावरील " मालविकेचें " चित्र आमचे मित्र व उज्जयिनीचे उदयोन्मुख कलावंत चित्रकार श्री. मुकुंदराव भांड यांनीं करून दिलें याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. पुस्तकाच्या छपाईचें श्रेय सर्वस्वी " मध्यवर्ती सहकारी मुद्रणालय, इंदूर " या संस्थेच्या चालकांनाच आहे. त्यांनीं निरनिराळ्या अडचणींना तोंड देऊन मुदतींत काम करून दिलें ही गोष्ट केव्हांही अभि-नंदनीय म्हटली पाहिजे.

प्रस्तुत काव्यसंग्रहाच्या प्रकाशनाच्या बाबतींत कांहीं थोडीशी घाई झाल्यामुळें मनांतल्या पुष्कळ कल्पना मनांतच राहिल्या. महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळाच्या चतुर्थ वार्षिकोत्सव प्रसंगीं हा संग्रह प्रसिद्ध करावा हा संकल्प अविच्छिन्नपणें पार पाडण्यासाठीं सर्व

प्रकारच्या अडचणी सहन करणें प्राप्त झालें व अनेक उणीवांची जाणीव होऊनही त्या दूर होऊं शकल्या नाहीत. ग्रंथप्रकाशनास विलंब लावूनही त्या दूर झाल्याच असत्या याविषयींही हमी देतां येण्याजोगी नव्हती. तेव्हां ठरलेल्या मुदतींत ग्रंथ प्रकाशित करून नियमितपणाचें श्रेय पदरीं पाडून घ्यावें या विचारानें हें काम हातावेगळें केलें आहे. मंडळानें केलेली ही सेवा महाराष्ट्र शारदेच्या दरबारांत रुजू झाल्यास मंडळानें योजिलेलें मध्यभारतीय प्राचीन मराठी कवितेच्या संशोधनाचें व प्रकाशनाचें कार्य अंगिकारावयास उत्साह येईल हें सांगणें नकोच.

उज्जयिनी,
मिती आश्विन शु. २
तारीख २९ सप्टेंबर सन १९३५.

**गं. ल. खिरवडकर,**
अध्यक्ष, महाराष्ट्र वाङ्मय मंडळ,
उज्जयिनी.

# प्रस्तावना

महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळाच्या वाढदिवसाच्या शुभ मुहुर्तावर ही मालवकन्या 'मालविका' आपल्या पतिगृहीं जावयास निघाली आहे. आजकालच्या रीतिरिवाजाप्रमाणें ती साधारणपणें यौवनावस्थेंत पदार्पण करणारीच आहे. तिच्या बरोबर पाठराखणीस कोणी पाहिजे आहे असें नाहीं; पण कन्या कितीही मोठी झाली असली तरी ती, वडीलधाऱ्या आप्तजनांना लहानच वाटावयाची व तिज-विषयीं दोन शब्द बोलल्यावांचून त्यांच्यानें रहावयाचें नाहीं. ही तिची पाठवणी मीं करावी अशी तिच्या माहेरच्या माणसांची इच्छा आहे. मी अंमळसा दूर असलों तरी माझा व तिचा संबंध असणें अपरिहार्यच आहे. आणि या नात्यानें तिच्या सासरच्या माणसांना तिच्या गुणावगुणासंबंधानें कांहीं सांगणें, तिचा अल्प-स्वल्प परिचय करून देणें व तिच्या माहेरच्या माणसांचा निरोप कळविणें हें मला केव्हांही युक्तच वाटणार. तिच्या सुखदुःखांत माझा वाटा आहे आणि म्हणूनच तिजविषयीं मी हे दोन शब्द लिहावयास तयार झालों आहें.

पण हें काम जितकें सोपें वाटतें तितकें नाहीं. ही मालवकन्यका सामान्य व्यक्ती नाहीं. ती जरी माळव्याच्या भूमींत जन्मली असली तरी, जानकी जशी जनकाची कन्या असूनही त्याची खरी मुलगी नव्हती, तर पृथ्वीच्या पोटांतून निघालेली होती, तशी ही मालवकन्या असूनही माळव्याची मुलगी नाहीं. ती माळव्याच्या भूमींतून निघाली आहे इतकेंच. शकुंतला जशी स्वर्गीय अप्सरेची कन्या तशीच ही

'मालविका' मालवभूमीवर संचार करणाऱ्या सरस्वतीची कन्या होय. तिजविषयीं, "**न प्रभा तरलं ज्योतिरुदेति वसुधातलात्**" असेंच म्हटलें पाहिजे. जनकानें, "**अविदितरुदितस्मितं विराजत्**" इत्यादि जानकीच्या बाललीलांचें कौतुक केलें आहे, तथापि तो जानकीचा अधिकार काय, हें जाणून होता. "**विश्वंभरा भगवती भवतीमसूत**" ही गोष्ट त्याच्या हृदयांतून नाहींशी झाली होती, असें मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें आम्ही मालवीय जन तिच्या लीलांचें कौतुक करीत असलों तरी तिचें मूळ ध्यानीं घेऊन आम्ही खरोखर तिला भ्यालें पाहिजे. तिचा अधिकार काय आहे हें आम्हास दृष्टीआड करून चालणार नाहीं.

आमचें ह्या ऐहिक सुखदुःख–सम्मिश्र प्रत्यक्ष पृथ्वीवरील जीवन कोणीकडे आणि तिचा कल्पनामय, अजब, रम्य मुलुखांतील संचार कोणीकडे ! आमचे पंचभूतात्मक पिंड कोणीकडे आणि तिचा विचार, भावना या सूक्ष्म तत्वांनीं रचलेला पिंड कोणीकडे ! "**अस्माकं बदरी-चक्रं युष्माकं बदरी तरुः**" असा बादरायण संबंध जोडून जसें कांहीं शेखीखोर लोक आपल्या कुलाचा संबंध एखाद्या बादशहाच्या रक्ताशीं जुळवूं पाहतात तसलाच हाही प्रकार आहे. पण यशोदेच्या घरीं प्रत्यक्ष परमात्म्यानें अवतार घेतला, तरी तिनें त्याला घुसळखांबाला बांधून काढलें किंवा वात्सल्यानें 'मख्खनमिश्री' त्याला भरविली; त्याचप्रमाणें ही मालविका कितीही थोर असली तरी वात्सल्याचा मोह आवरणें आम्हाला कठिणच आहे. कांहीं झालें तरी मजसारख्यानें तिच्याविषयीं दोन शब्द बोलावें हें काम अत्यंत जोखमीचें आहे यांत कांहीं संशय नाहीं.

माळव्यांतील ही कन्या, असेल एखादी गांवढळ, खेडवळ, जनपदवधू असेंही कित्येकांना वाटण्याचा संभव आहे. पण त्यांनीं

असे शद्ब उच्चारतांना तिच्या कुलाचा विचार करून आपली जीभ चावली पाहिजे. ही मालवभूमिका वंध्या आहे असें स्वप्नांतही मनीं आणतां कामा नये. जिनें आज दोन हजार वर्षें साऱ्या जगाला वेड लाविलें आहे आणि शोपेनहार व गटे सारख्या वेदाभ्यासजड तत्व-ज्ञानांनाही नाचावयास लाविलें आहे ती शकुंतला ह्या मालव-भूमीचीच कन्या होय हें विसरून चालावयाचें नाहीं. कविकुलगुरु कालिदास ज्या भूमींत जन्माला आला तिचा कल्पनाविहार केव्हां व कसा प्रकट होईल हें कोणी सांगावें ?

प्रख्यात कवी भवभूती याची जन्मभूमी कोणती हा प्रश्न जरी वादग्रस्त असला तरी व ती प्रत्यक्ष माळव्यांत नसली तरी माळव्याच्या सीमाप्रांतावर पवायानजीक निश्चित होऊं पहात आहे. भर्तृहरी, मुंज, भोज इत्यादि प्रथित-यश राजांना आणि त्यांच्या नवरत्नांना साहित्य-लोलुपजन कधींही विसरू शकणार नाहींत. विदिशा, धार येथील विद्यापीठांचे अवशेष सदासर्वदा माळव्याच्या साहित्य-गौरवाची कथा सर्व जगाला सांगत राहतील. अशा भूमीची कन्या ही 'मालविका' आहे. इतका तिच्या कुलशीलाविषयीं उल्लेख केला म्हणजे पुरें.

' बडे बाप के बेटा ' अशी मला तिची बढाई करावयाची नाहीं. अखेर तिच्याच आंगच्या गुणावगुणांवर तिचें कर्तृत्व अव-लंबून राहणार हें मी जाणून आहे. तथापि आनुवंशिक संस्कार सर्वस्वी उपेक्षणीय असतात असें नाहीं. आज नाहीं उद्यां कधीं तरी त्यांचा प्रादुर्भाव झाल्यावांचून राहणार नाहीं असा मला विश्वास आहे. आजच्या साहित्योपवनांत जे अनेक प्रकारचे लहान मोठे पक्षी गात आहेत त्यांच्या सुराला हिचा सूर मिळणार नाहीं असें मला वाटत नाहीं. प्रस्तुत संग्रहांत तिचे कांहीं बोबडे बोल असतील, कांहीं बेसूर ताना असतील तर कांहीं कसलेल्या गायकासही मोहून टाकतील अशाही

ताना सांपडल्यावांचून राहणार नाहींत. कोणी पूर्व-ग्रह एकीकडे सारून केवळ निर्विकारपणें या ताना ऐकूं लागेल तर कोठें कोठें त्यांना उत्कृष्ट गंधर्वाची आठवण झाल्याखेरीज राहणार नाहीं.

प्रेमाच्या क्षेत्रांत बरींच फुलें आपल्या रम्य उठावदार वर्ण-छटांनीं अत्यंत मोहक झालेलीं असून या मालवीकाव्योपवनांत दरवळत असलेलीं दिसतात. प्रेमाचें नांव घेतांच अलीकडे कित्येक पंडित नाक मुरडतांना दिसतात; पण मानवी हृदयाचा जर त्यांनीं विचार करून पाहिला तर त्यांस कळून येईल कीं साऱ्या भावना-चक्राचें केंद्र प्रेम होय; आणि, रति ( Sex attraction ) होय असें म्हटलें तरी अयोग्य होणार नाहीं. अर्थात् शृंगार रसानें साऱ्याच कवींना मोह घातला आहे. जो या केंद्रस्थ भावनेची कळ दाबून सारें भावनाचक्र फिरवूं शकतो तोच मानवाच्या कर्तृत्वाची बाजू उज्वल करूं शकतो. कधीं कधीं त्याचा सूर अंमळसा कानाला अनुचित—वर्तमान जनहृदयाला अश्लील—असा भासला तरी मनुष्याच्या भावनांचें सुदर्शनचक्र फिरवून तोच साऱ्या कुभावनांना नष्ट करूं शकतो; हें विस्तारानें प्रस्तुत ठिकाणीं सांगणें अप्रासंगिक होईल, परंतु या पुस्तकांत जीं प्रेमगीतें संकलित केलीं आहेत तीं अन्यथा होत असें कोणी समजूं नये म्हणून वरील उल्लेख करणें भाग झालें, असो.

0 प्रस्तुत पुस्तकांतील प्रेमगीतें साधीं व सरळ आहेत. तीं हृदयांतून उद्भवलीं असून हृदयास भिडणारीं आहेत. तीं आपल्या आंवाक्या-बाहेर उड्डाण मारण्याचा आंव घालीत नाहींत. तीं कधीं विरहाच्या कळा सांगतात ( **आलिस कां आंगणीं.** ), कधीं प्रिय विषयाच्या नेत्रांतील जादूचें वर्णन करितात, कधीं विश्वांत जिकडे तिकडे प्रेमाचें राज्य चालूं असतां मनुष्यानें मात्र तद्विषयीं वंचित असावें याबद्दल खेद प्रगट करितात ( **माणसेंच कां गे?** ); त्याच प्रमाणें केवळ बाह्या-

लंकारानें हृदयाची तहान भागण्यासारखी नाहीं, असें सांगून हृदयाचें विरहांतही सम्मीलन होऊं शकतें असा सुरस गोड सूर काढतात (स्वागत).

सागराला, आकाशाला रत्नांचा किंवा तारकांचा ठेवा मिळाला असेल, पण प्रेमाच्या ठेव्यापुढें त्यांचें तेज फिकेंच असें सांगून आपल्या प्रियेच्या प्रेमाची अपेक्षा करितात (**सागराला मौक्तिकांचा**), रात्रीचें साम्राज्य प्रशांत, गंभीर, असें पसरलेलें असतां जिकडे तिकडे तिचें वैभव फुललेलें पाहून ती प्रियेला म्हणतात,

'मी असा नी तूं अशी, रात्र ही अशि चांदणी
लाडके, सुमनाहुनी मृदुल पाउलिं ये झणी,
येच दोघी गुपाचिपी, चल जाउं दूर घनी वनीं'

याप्रमाणें प्रेम-भावनेचा सौम्य शीतल पण मोहक आणि कोमल विलास प्रस्तुत गीतांतून दिसतो. कधीं हीं गीतें रमणोपालंभन करतात व '**तुला प्रीतिची कदर नसे**' असा झोंकदार राग दाखवितात; आपल्या प्रियेच्या वैभवाची वाखाणणी करून हळूंच असा खोंचून प्रश्न विचारतात '**भावल्लीचीं सुमें या भाग्यवंतालाच कां**', कधीं विवाह-प्रसंगीं मनांतून उखाणा घेण्याचें असतांही नववधूची लाजेनें कशी मुरकुंडी वळते हें सांगतात (**घांस**), कधीं लतिकेचें व प्रियेचें ऐक्य वानितात (**लतिका**). प्रस्तुत प्रेमगीतांत कांहीं भाषांतरितेंही आहेत. त्यांतलि भाषांतराची शैली व कला खरोखर वाखाणण्यासारखी आहे. '**प्रीत अशि जडली**' हें गीत आणि '**स्वप्न-गगनिं मम**' हीं दोन्हीं गीतें या दृष्टीनें उल्लेखनीय आहेत; हीं मूळ टागोरांच्या 'Gardener' मधील गीतें. तीं मूळचीच उन्मादकारक व भावनांनीं रसरसलेलीं. त्यांतील रसपरिपोष मराठीच्या रूपांतरांत किती पूर्णपणें प्रगट केला गेला आहे, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

० करुणरसाच्या क्षेत्रांत देखील, प्रस्तुत संग्रहांत कांहीं बहुमोल, हृदय पिळून काढणारीं कवनें आहेत. गरिबांचें दैन्य व भांडवलशाहीची त्याविषयीं बेपर्वाई; या विषमतेचीं हृदयद्रावक दृश्यें 'सारंगी वाजते' या गीतांत चितारलीं आहेत.

'साथींत देविच्या मजुरांचीं बालकें
तडफडुनी मेलीं–भक्ष्य देविला मिळे !
नी माय तयांची किंकाळया फोडिते
परि उंच उंचशा कुण्या हवेलीमधें,
मालका रिझविण्या सारंगी वाजते !!!'

हें दृश्य आजकाल आपल्याला मोठमोठ्या शहरीं किती तरी पहावयास सांपडेल. अशा परिस्थितीनें कवीचें मन चिडून जावें व कळवळावें हें योग्यच आहे. दुसरा एक कवी हीच विषमता वेगळया शद्बांनीं सांगतो. जिकडेतिकडे लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं अभ्यंगस्नानें, नानातऱ्हेचीं पक्वान्नें यांची चंगळ चालली असतां दुसरीकडे 'हृद्वन्हीवरती सदा शिजविणें कोड्यांत मांडे निके' असें पाहून या कवीला चटके बसले आहेत. भिकाऱ्याशीं निर्दयतेनें वागलेलें पाहून तो चेवून असा सवाल करतो कीं या जगांत भिकारी कोण नाहीं? देव देखील भिकारी आहे! असें तो त्वेषानें म्हणतो. ही गरिबांविषयींची तिडीक पाहिली म्हणजे 'सारंगी वाजते' या कवितेच्या कर्त्याप्रमाणें, त्याचें कौतुक करावेसें वाटतें. ०'तें फूल–हें फूल' यांतील विरोध कोणाच्याही डोळयाला अश्रू आणील. या जगांत माणसें आशेचे किल्ले बांधतात आणि त्यांना प्राप्य वस्तू हस्तगत झाल्यासारखी वाटते तोंच अकस्मात् तोंडचा घास गळून पडावा असें झालें म्हणजे मनाचा किती हिरमोड होतो हें ज्यांस पहावयाचें असेल त्यानें 'आशा निराशा' हें गीत वाचून पहावें. या करुणरससंबंधीं सांगतांना जातां

जातां मला एक अत्यंत हृदयस्पर्शी गीताचा उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. मला असा बळकट संशय येतो कीं त्याच्या कर्त्याला कसल्या तरी वियोगाचा जबर धक्का बसला असावा. त्याशिवाय काळजाला घरें पाडणारे असे शब्द निघणार नाहींत. तें सुनीत 'तो देव का मर्त्य का' हें होय.

० प्रस्तुत संग्रहांतील वत्सल रस खरोखरच हृदयंगम आहे. एकाहून एक साऱ्याच कविता इतक्या सरस आहेत कीं त्यांतील तारतम्य सांगणें कठीण आहे. त्या कवितांत पांडित्याचें उगीच स्तोम माजविलेलें नाहीं. कित्येक वेळीं कवी बालविषयावर लिहूं लागले म्हणजे एखाद्या तत्त्वज्ञाची भूमिका घेतात; आणि धोंड्यावर टाकीचे घाव घातले म्हणजे जशी देवाची मूर्ति निर्माण करतां येते त्याप्रमाणेंच बालमनावर संस्कार घडविल्यानें उत्तम नागरिक निर्माण करितां येतात, अशीं तत्वें सांगू लागतात. किंवा शिक्षकाची भूमिका घेऊन विधिनिषेधाचे पाठ देऊं लागतात. पण असल्या प्रकारचें ढोंग यांतील कवींनीं केलेलें नाहीं ही आनंदाची गोष्ट होय. ते बालकांच्या बाललीला सांगण्यांत रमतात ( बेबी व लीला ); मुलांची दांडगाई पाहून आईबापें कशीं कौतुकतात हें सांगतात ( हे सांग कशानें होई ); आपल्या मुलीच्या ठायीं अरुंधतीची तारका त्यांना चमचम करतांना दिसते ( कुंद-कलिका ). बालाच्या रूपगुणांमध्यें आपलें भान हरपलेलें ते सांगतात व देवाला असा सवाल करतात 'विश्वंभरा तुला असे कां रे आई, कोण तुझ्या पाही कौतुकाला ?' तात्पर्य, आईबापांच्या ठायीं जी स्वाभाविक वत्सलता वसत असते आणि जींमुळें घर स्वर्गाहूनही मनोरम होतें तिचेंच आईबापाच्या भूमिकेवरून हे कवि वर्णन करितात, त्यामुळें ही बालविषयक गीतें खरोखरीच हृदयस्पर्शी झालीं आहेत.

एखाद दुसरें ग्रामदृश्यही प्रस्तुत संग्रहांत आहे. त्याचें प्रमाण अल्पच खरें पण डोळयांस दिपविणारें आहे. (**वादळांत सापडलेली गुराखीण**).

प्रस्तुत पुस्तकांत दोनतीन 'राधामाधव गीतें' आहेत. हा विषय जुनाच असला तरी त्याचा नूतन अवतार येथें पहावयास सांपडतो. **'मेघास' 'राधा-माधव-विनोद' 'नयनीं भरलें रूप तुझें'** हीं सारींच कवनें सुंदर आहेत. खरें म्हणावयाचें म्हणजे हीं गीतें शृंगाराचे सदरांत जावयास पाहिजेत. पण मानवी प्रीती व देवादिकांची प्रीती ह्यांचा घोटाळा होऊं नये म्हणून संपादकांनीं हीं वेगळया सदरांत घातलीं असावींत असें वाटतें.

प्रस्तुत संग्रहांत छंदोभंगासारखे थोडे किरकोळ दोष आहेत; नाहीं असें नाहीं. पण हे दोष क्षुल्लक असल्यानें हें छिद्रान्वेषण करण्याचें कंटाळवाणें काम करण्यास तूर्त माझें मन घेत नाहीं.

क्षिप्रातीरावरील एक जोगी **'अलख'** जागवीत भिक्षेला निघाला आणि त्यानें परिश्रम करून सुंदर मधुगोळा केला.

'तो मधु या सुमदलपुटिं भरला
फिरुनी फिरुनी गोळा केला
रसिका! मधुपा! तुज अर्पियला
हृदय-संपुटीं सांठव याला.'

अशी या जोग्यानें रसिकांजवळ याचना केली आहे. हा त्याचा विनय त्याला साजेसा आहे. पण मला वाटतें कीं रसिक मधुप या मधूनें भरलेल्या सुमदल–पुटांवर उड्या घालतील, त्याभोंवतीं घिरट्या

घालतील आणि या जोग्याचे अनेक उपकार स्मरतील. हे जोगिराया तूं '**हृदयसंपुटीं सांठव याला**' अशी रसिक मधुपांजवळ भिक्षा मागत असलास तरी मधुपगण तुजभोंवतीं घोंगावून, आणखी आणखी मधु आणून दे, येवढ्यानें आमची तृप्ती होणार नाहीं, असें म्हणून तुला दे माय धरणी ठाय असें करून टाकतील. आजच्या फुलांतून तूं मधु गोळा करून आणला आहेस खरा; पण या माळव्याच्या मधुभांडारांत जे मधुघट आज अज्ञात आहेत ते तूं बाहेर काढ आणि ही मालवभूमी 'कविकुलगुरूंची' जन्मभूमी आहे याची प्रचिती जगास आणून दे; तेव्हांच आम्हीं तुझी पाठ सोडूं. तूं आम्हाला आतांच कुठें मधाचें बोट लावलें आहेस तेवढ्यानें आमची तृप्ती कशी व्हावी ? आम्हीं मराठे सुमारें दोनशे वर्षांपूर्वीं आपली संस्कृती घेऊन मालवभूमीवर अवतरलों तेव्हांपासून आम्हीं मधुविहीन कोरडेच राहिलों असें तुला वाटतें काय ? तसेंच असेल तर तें तरी सिद्ध करून दे, आणि नसेल तर सांठवलेले मधुघट जेथें कोठें तळघरांत दडवून ठेवले असतील तेथून बाहेर काढून आण. त्याशिवाय आमचें समाधान होणार नाहीं.

लष्कर (ग्वाल्हेर)
अनंत चतुर्दशी
११ सप्टेंबर १९३५

# समर्पण

क्षिप्रेवरला जोगी आला
साधु-संघही सर्व निघाला ध्रु.

निर्मलतेची कफनी घाली
सद्भावांची घेई झोळी
'अलख' जागवि फेऱ्या घाली
" भवति प्रतिभे ! भिक्षा घाला. "

ऐकुनि कानीं सुमधुर वाणी
ज्योति स्फुरल्या मेघामागुनि
म्हणती स्वर्गीय गुंजन करुनी
" जोगी कोणी खालीं आला ! "

करुनी मधुपद पदविन्यासा,
निसर्ग-रुचिरा, मधुमय-हासा
प्रगटवुनी मधुभाव-विलासा,
अर्पिति वाङ्मय-मधुरस त्याला.

तो मधु या सुमदलपुटिं भरला,
फिरुनी फिरुनी गोळा केला,
रसिका ! मधुपा ! तुज अर्पियला,
हृदयसंपुटीं सांठव याला.

—रा. वा. पंतोजी.

## १ माळवा—

( माळव्याच्या पठारावर आगगाडी आल्यानंतर दोन प्रवाश्यांत झालेलें संभाषण )

“ विंध्य विंधुनी आलों आपण पहा पठारावरी
पहा ते दूर राहिले गिरी.
जिकडे तिकडे दोहि बाजुला क्षितिजापर्यंत ही
दिसुन ये धान्य-विभूषित मही.
मंद समीरण शीतल सुखकर तोषवितो तनुस हा,
निरोगी व्हाया येथें रहा.
निसर्ग आणिक नगरें येथिल सुखवितात या जना,
रीत ही रुचली माझ्या मना.
ह्या क्षेत्रदेवता वितरति जें जें हवें
हीं नगरें सजविति देति रूप त्या नवें
सहकार्य असें हें मानवास मानवें,
निसर्गसौंदर्याच्या परिवेषीं मानवता खुले,
पाहुनी तीच चित्त मम भुलें. ”

“ उंच-सखल नच, सर्व सारखी, रम्य भूमि ही गणी
तूजविण कवण अरासिकाग्रणी !

गिरिगहनांतिल निर्झर नाहिंत, नाहिंत पर्वत, दऱ्या,
पहाया वनशोभाही बऱ्या.
' पाथोधीची श्रवणीं न पडे मंद धीर गर्जना '
मुळीं ती माहित नच या जना.
क्वचितच प्रेमळ सृष्टि सती दर्शन,
कदाचित करि ती सस्मित अवलोकन,
प्रगटवुन भव्यपण, उदात्त करिना मन
नवल नसें कां, परप्रांत हे तुजसि रुचावे ? मुला !
सुचावें कवन त्यावरी तुला ? "

" सख्या सहचरा ! खचित मुलांच्या दृष्टीनें तूं पहा,
आणि नवविचार कांहीं सहा.
नितांत निर्मळ निसर्ग मजला कोण म्हणेना हवा
सुखाचा निधी सदाचा नवा.
रम्य खरोखर निसर्ग म्हणजे स्वर्ग असे भूवर,
रम्यतर पण मज वाटे नर.
दिक्काल हांसती, म्हणती तुजला खुळा,
तूं स्वार्थ साधितां म्हणती तुज बावळा
मूर्खत्व गमे तव चातुर्याच्या कळा.
मानवतेचें रूप मनोहर नयनीं जेव्हां भरे,
आपपर-भाव भाव खास रे !

नगरोनगरीं विराजतीं तीं भिन्न भिन्न नृपकुळें
दाविती विभिन्नपण आपुलें.
जनता जमली विविध, होउं चल समरस या संगमीं
हळुंहळूं चल सळमिसळूं अम्हीं.
ओळखून घ्या भाषा अपुल्या, येथें जमल्या किती,
ललितगुणिं रमल्या लीलावती.
ह्या मानवधर्मक्षेत्रीं येऊनियां,
साधुनी स्फूर्तिच्या सुमुहूर्ता निर्भया !
करि येथ निमज्जन दिव्य रूप व्हावया
धर्म मिळाले, पंथ जुळाले, ऐक्य कांहिं संभवूं
मनाचें मोठेंपण अनुभवूं. ”

“ मेळ सृष्टिचा जमला, गमला अधिकच रम्याद्भुत,
स्तवीती तोच कवी प्रस्तुत.
श्रमापहारक, शांत सृष्टिचें स्निग्ध रूप पाहुनी,
तदंकीं नीज, शांति लाहुनी.
सुंदरतेच्या अक्षयतेचें गीत गात निजविल,
तूज ती नयनजलें भिजविल.
नेऊन निवांतस्थलिं निज, तदनंतर
उघडून हृदय, काढून शल्य सत्वर
फिरवील अमृतकर, अमृतदृष्टि त्यावर

दिव्य गड्या ! होशील विहराशिल सृष्टिसवें सुंदर,
दूर अति जनतेपासुन जर."

" हृदय विदारिति विदित तुला नच, असह्य असती मला
प्रेममय रुचिर वृत्ति कोमला.
मानवतेच्या ममतेचें शुभ आशीर्वच घेउनी
ध्यावुनी तीज, कवच लेवुनी,
रणांगणावर आलों, स्वकरें करुनी जोहार,
इकडची रीत जुनी फार,
मन तेंच भावितें, दृष्टि तेंच दावितें,
अस्वस्थ तेंच करि, पिसेंच मज लावितें,
मी जाइन म्हणतों, मजला बोलावितें,
ती मानवता, मानवता ती, भूषण साऱ्या जगा
पट्टणा आणि प्रस्तर नगा."

ती बघ येथें, जेथें तेथें, गमे मला मालव,
जगाचा आदर्शच हा लव.
निसर्गनिर्मित निसर्गसुंदर उच्चासनिं बैसली
देवता दिव्य कुणी ह्या स्थलीं !
नव्हे नव्हे काव्य हें, कवि न मी, प्रत्यक्षच पाहतों
तेंच मी जरा रचुन बोलतों.

मज अधिक जवळचा नरच निसर्गाहुनी
ही विंध्यवासिनी मानवता पाहुनी
ती अधिकच ठसली मनिं त्या विंध्याहुनी
विंध्य विंधुनी आलों आपण पहा पठारावरी,
पहा ते दूर राहिले गिरी. ”

—के. ना. डांगे.

---

## २ अम्बरवात—

अफाट उघड्या मैदानांत
या टोंकाहुन त्या टोंकास
असा सारखा चोविस तास
    फिरे झिङ्गला अम्बर-वात. ध्रु०

पूर्वेच्या खान्द्यावर हात,
दुजा पश्चिमाराणिकरांत
    पिङ्गा घेई गाणें गात.

आकाशाला लावी हात,
पाय हालवी उन्मादांत,
    मजलेदार हंसे झोंकांत.

हिरव्या गवतावरुनी पाय
अल्लद टेंकुनि चालत जाय;
    ज्वारीची थरथरते पात.

क्षितिज-रवी तो कम्पे खात;
खुळ्या जिवाच्या या मेण्यांत
    आशेची थरथरते वात.

## अम्बर-वात

वातावरणीं मेघ उदास,
श्वासांवरती विरली आस,
वारा झुलवी हातोहात.

या टोंकाहुन त्या टोंकास
असा सारखा चोविस तास
फिरे झिङ्गला अम्बर-वात.

—भालचंद्र लोवलेकर.

## ३ फूलराणी—

लतिकेचा झोंपाळा, झुलत फूलराणी—
साथ देति मैत्रिणी नि गात गोड गाणीं;  ध्रु०
ओसरते रात, नवी येतसे प्रभात,
बागडतो स्वैर चपल खोडसाळ वात,
हालवीत संथ झुला, गीत गात जात,
कुजबुजतो कानिं कधीं सांगतो कहाणी.  लतिकेचा—

तन्मय ही सृष्टि सकल गीतरूप पाही,
कुंजवनीं मंजुगान भरुनि उरुनि राही,
ताल देत निर्झर हा, लव विराम नाहीं,
सूर धरी दूरवरी कोकिळा शहाणी.  लतिकेचा—

कोंवळे किरण नवे करित गुदगुल्या,
मधुर खळया गालिं किती गोड पसरल्या,
लाजऱ्या कळया हंसत रमत उमलल्या,
दृश्य रम्य वर्णाया शक्त न ही वाणी.  लतिकेचा—

सुंदरताबाग फुले, भागला चितारी,
संगीतें गुंग उभा गायक हा दारीं,
विखुरला परिमलही, भारला फुलारी,
'तोडुं कसा?' प्रश्न उभा, लोचनांत पाणी !  लतिकेचा—

—प्र. ब. माचवे.

## ४ विकसन—

( ओवी )

निळ्या दाट गगनांत
अर्धस्फुट चंद्रकला
आवडते थोराबाला
इवलीशी.

संपली ही गाढ निशा
आली उदयाला उषा
लैवोनिया चित्र वेषा
आनंदवी.

लतिकेच्या कटीवरीं
कैसे खेळे सुमबाळ
मोद देई सर्वकाळ
रसिकाला.

जननीच्या अंकावरी
क्रीडा करी शिशु सान
सर्वस्वाचें हें निधान
मोददायी.

चाले नित्य विश्वामाजीं
विकसन हर घडी
रसिकाला त्याची गोडी
किती वर्णू.

—द. ल. अडौणी.

## ५ जयस्तंभ—

[ मध्यहिंदुस्थानांत मंदसोरजवळ माळव्याचा राजा यशोधर्मन् ह्यानें हूण लोकांचा पराभव केल्याचा उल्लेख असलेला एक जयस्तंभ आहे. त्यावर त्या राजाची प्रशस्ति लिहिली आहे. हा जयस्तंभ फार भव्य आणि मुख्यत: एकाच दगडाचा आहे. त्या सारखा दुसराहि एक जयस्तंभ त्याच्या जवळ आहे.]

करी स्तंभित प्रेक्षका मालवेशा !
यशोधर्मराया ! जयस्तंभ ऐसा,
बरा शोभतो तो पथीं विस्मृतीच्या,
बऱ्या टाळण्या कीं मती दुर्गतीच्या.

नभासारखी कीर्ति या भारताची
असे स्तंभ आधार तीला तसाची.
पडे छिन्नभिन्नांग तो भूतलाला,
गमे कीर्तिचाही अध:पात झाला.

जसे आज आम्ही तसा हाहि आतां !
जसे पूर्वि होतों तसा हाहि होता !
यशोधर्मरायें यशाचा स्वधर्म
इथें स्थापिला मूर्त, हें होय मर्म.

खरें काय येथें असे वीर होती ?
खरें काय ते हूण आम्हां नमीती ?

## जयस्तंभ

खरें काय ज्यांना न रीती न भीती,
तयां दाखवील्या अम्हीं युद्धनीती ?

सदा लुब्ध, विध्वंसकांच्या गणांना,
महाक्रूर, संक्षोभकारी, हुणांना
दिले हाकुनी राक्षसांना अशांना,
जसे हांकलीती शृगालां शशांना.

स्वयंपूर्ण सारेच आम्हींच आम्हीं,
तदा नांदलों येथ स्वातंत्र्य-धार्मी.
असा काळ तत्काळ गेला निघून,
यशोल्लेख झाले; लिही जेंवि घूण.

असें ह्यास्तव प्रेम ये ह्या स्तवाचें,
लिहूं काय काव्यीं, वदूं काय वाचें ?
दृढालिंगनें आदरूं त्यास हर्षें,
सहस्रावधी लोटलीं ज्यास वर्षें ?

वदे तो, " रहा दूर पाषाण मीही
पहा तूमची कीर्ति रक्षूं शके ही;
तुम्हां मात्र सत्पात्र हें नांव लाहे
परी भारताची कुठें चाड आहे ? "

—के. ना. डांगे.

## ६ आर्यभूमातेस—

आर्ये ! देवी ! त्रिभुवननुता मंगला, दिव्यगात्री,
तेजोराशी, गुणगणखनी, रत्नगर्भा धरित्री,
सद्वृत्तात्मा, सदय–हृदया, शौर्यशीला म्हणोनी
आहे भावें नति तव पदां जोडुनी हात दोन्ही.

सत्त्वाची तूं असशि जननी सत्य वंद्या त्रिलोकां,
सद्धर्मांचा सुपथ सुमनें दाविशी आर्य-लोकां,
तत्वज्ञानी निगुति शुभगे ! सर्वशास्त्रप्रवीण—
होवोनी तूं गमशि सकलां सर्वदा ‘ धन्य ’ जाण !

सौभाग्याचें सदन जगतामाजिं तूं एक होशी,
ऐश्वर्याची अनुपम मनीं भासशी मूर्ति खाशी,
लावण्याची ललित लतिका होय ही त्वत्सुकीर्ती—
प्रेमोल्लासें कविगण सदा सत्य गे ! सत्य गाती !

दुर्दैवानें अनुचित दशा आज ही तूज आली,
पूर्वींची ती स्थिति सुखमया सर्वही नष्ट झाली !
केलें त्वां गे ! असशि जननी ! कोणतें घोर पाप—
आला ऐसा म्हणुनि तुझिया प्राक्तनीं थोर ताप !

## आर्यभूमातेस

त्वद्दैना ही बघुनि मजला खेद अत्यंत होई,
सौख्यप्राप्तीस्तव तव पदा, आत्मदेहास वाही,
माते ! आतां वरद-कर तो ठेविं माझ्या शिरीं तूं—
जेणें माझे सुफलित जगीं सर्व होतील हेतू !

—कृ. गं. कवचाळे.

---

## ७ 'कां भीसी तरुणा मरणाला!'

( सत्याग्रह चळवळीच्या वेळीं ही कविता लिहिली आहे. )

कां भीसी तरुणा मरणाला?
छे! क्षमा न तेथें शरणाला. ध्रु०

मरण कुणाला चुकेल कां तरि?
चुकलें कोणा सांग आजवरि?
जन्मा आलें तुझ्या बरोबरि,
तें जाइल संगें मसणाला. भीसी—

मरणभयें तूं झुरसी निशिदिनिं
वावरसी बघ लपुनी छपुनी
खाशी पीशी फुंकुनि जपुनी
हा उपाय नाहीं तरणाला. भीसी—

आवडते तुज चैन दिखाऊ,
गाद्या गिरद्या, गालहि मउमऊ,
विषयसुखाची ओढ जिवा बहु
वेचिसि बळ भयकरणाला. भीसी—

गळल्यावरती सारी हिम्मत–
तुझ्या मृत्युला कांहिं न किंमत,

ऐस असंमत अथवा संमत,
तो ओढुन नेइल सरणाला. भीसी—

वणवा भडके अन्यायांचा,
सीमा नुरली तामस जाचा,
नेत्र न कां तुज, झाल्या खांचा ?
धिःकार अशा तव जगण्याला !! भीसी—

दाबुन मृत्यू टांचेखालीं—
क्रुद्ध नजर फिरवी भंवतालीं,
धाउन वेगें कुठार घाली
पळख लवु न दे बघण्याला. भीसी—

अडवुनि मरणा एक्या हातें—
ओढ, पाड तुडवी जुलमातें,
हाण आडवे येतिल त्यातें,
धजतिल न कुणी धरण्याला. भीसी—

फोड जितांचे तुरुंग दगडी,
नरश्वापदां बांधुन रगडी,
नीचपणाची दाबुन नरडी—
तूं घाल बांध निज पतनाला. भीसी—

संघटलेली कडाडणारी,
धडक एक तव पुरे करारी;

उलथुन पडतिल हिमनग भारी,
मग कशास लोळण चरणाला ? भीसी—

हेंच वय तुझ्या ऐश्वर्याचें,
निर्भयतेचें, मर्दपणाचें,
असिधाराव्रत पाळायाचें;
चल ऊठ, लाव जग हंसण्याला. भीसी—

दावुनि असला विक्रम उन्नत,
अभिमानास्पद जगून जीवित,
करी मृत्युला क्षणभर विस्मित
आव्हान देइ मग तूं त्याला. भीसी—

मृत्यु तोच जो घरघर रडविल,
सर्व जनांला हुरहुर लाविल,
स्मशानयात्रा जगभर निघतिल,
धन्य मरण अनुकरणाला. भीसी—

असेंच मरणें ध्येय धरुन मर,
मरण न अमरत्वाचें तें घर,
सोड दिशा ही माघारा फिर,
घे हीच शपथ दृढकरणाला. भीसी—

—वि. ह. आपटे.

## ८ लक्ष्मीपूजन ( दिवाळी )—

प्रातःस्नान चतुर्दशीस करिती अभ्यंग उष्णोदकें
पक्वान्नें सुखवस्तु सेविति किती नाना तऱ्हेचीं सुखें;
कोणाच्या नशिबीं त्रिकाळ करणें ये स्नान बाष्पोदकें !
हृद्वन्हीवरती सदा शिजविणें कोंड्यांत मांडे निके !

दारोदार सहस्रदीप जळती, अंधार ना राहतो
कोणी जीवित शुष्कवात विझती सारीत तो राहतो;
दारूकाम घरोघरीं फुरफुरे; बालप्रजा बागडे
किंकाळी उठतां क्षुधार्त शिशुची धांवे कुणी त्याकडे !

लक्ष्मीपूजन थाटतां विलसती शालूमयी त्या किती;
कोणी गुंफित अश्रुमाळ पुजण्या लक्ष्मी गृहाची सती !
पुष्पें अत्तर नाचरंग उडती, लाह्या किती वाटती;
आशेच्या फुटती चिताग्निवरतीं लाह्या कुणी फाकिती !

भाग्याचा दसरा सुखांत झुलवी, तैशी दिवाळी जनां;
कष्टाची शिवरात्र येत नशिबीं संसारहोळी कुणा !
देवा ! दीनदयाघना ! सुकरुणा ऐशांवरी वाहवीं;
संसारीं वठतां तरू फुलविसी केव्हां नवी पालवी !

—य. खं. कुळकर्णी.

# ९ कोण ना भिकारी ?

( राग—कालिंगडा, त्रिताल. )

[ रावानें रंकाला आढ्यतेनें धुत्कारतांना " सर्वांभूतीं परमेश्वर " हा विचार तर बाजूला राहतोच पण " तृणेन कार्यंभवतीश्वराणां " ही व्यावहारिक दृष्टी सुद्धां दृष्टी आड होत्ये. भिकाऱ्याच्या अंगावर ओरडण्यांत एक प्रकारचें भूषण वाटतें. ]

" जा इथून, चल जा ! " वदलों शद्ब हृद्विदारी !
मागणें न शिवलें ज्यातें कोण तो करारी ? ध्रु०

कीर्ति थोर ऐकुनि आला । दानलुब्ध अतिथी झाला
क्लेश लेश वाटे नुरला । भेदिला जिव्हारीं !

वस्त्रही न झांकायाला, । द्रव्य ही न तें मागाला;
याचना करी तो ज्याला । होय तो भिकारी !

तीव्र दुःखही परक्याचें । बोलतात शीतळ साचें;
त्यामुळेंच निघती वाचे । शद्ब ते विषारी !

मागण्या दुपारीं येतां । शब्द भेदितो तो चित्ता !
देह पोसण्याची चिंता । भटकतीं बिचारीं !

## कोण ना भिकारी ?

‘ अन्न अन्न ’ ओरडतां ते । कां न अंतरीं कालवतें ?
खाद्य पेय कैसें रुचतें । त्या क्षणीं दुपारीं !

“ माय-बाप हो,” दीनाचे— । स्पष्ट शब्द येती त्यांचे;
शब्द वेगळे थोरांचे । नांव त्या ‘ उधारी ’ !

गुंड पुंड करिती चोरी । शस्त्रघात करुनी भारी
संपदा लुबाडिति सारी । क्रूर ते भिकारी !

“ बांगड्या कुड्या द्या लुगडीं, । शालु पातळांची जोडी ”
केश ते फुलांची परडी । गोड हा भिकारी !

“ जरा पीठ उसनें द्याहो, । धर्म हाच शेजारा हो ? ”
शिष्टमान्य हो हा टाहो । सभ्य ते भिकारी !

काय बोलणें रंकांचें । कर्जवंत नृपही साचे;
राष्ट्र राष्ट्र ध्याच जगाचें । ती दिवाळखोरी !

मूषकास मार्जारानें, । मांजरासही श्वानानें,
रंक गांजणे रावानें । शिष्ट हे भिकारी !

शिशिर याचि मधुमासाला । ग्रीष्म याचितो मेघाला,
तो चकोरही चंद्राला । सृष्टिचे भिकारी !

त्या निरिच्छ संतजनांनीं । मुक्तियाचनाच करोनी,
देव आळवावा भजनीं । मुक्तही भिकारी !

आंधळयास जन्मांधानें । नायके तया बहिऱ्यानें,
कां फुका विदारण करणें । धाव ते जिव्हारीं ?

पूर्णता जगीं नांदावी, । न्यूनता जगीं न उरावी,
अशी सृष्टि केव्हां व्हावी ? । 'कुणीना भिकारी' !

सर्व शक्ति सत्ताधारी । ईश एकला अविकारी,
क्षुद्र बापुडीं नरनारी । संकटीं भिकारी !

परी पूर्ण ऐश्या देवें- । वामनें भिकारी व्हावें,
बळी पासूनी मागावें ! । ईशही भिकारी !!

× × ×

याचना चुके कोणाला ?
जग हें भिकारी !!

—य. खं. कुळकर्णी.

## १० आग—

( चाल--नागीण चपल )

[ प्रवासांत असतां आगगाडीत आमचे डब्यांत एक ब्राह्मणाचें कुटुंब येऊन बसलें. त्या लहानशा कुटुंबांत तीन गतभर्तृका होत्या ! त्यांना पाहून मला कौमार्यावस्थेंत स्वर्गीं गेलेल्या माझ्या धाकट्या बहिणीची स्मृति झाली. त्या प्रसंगास उद्देशून. ]

ही आग भडकली खालीं,
तज्ज्वाला
गगनाला
पोंचली आज या कालीं ध्रु०

किती पोकळ्या कळ्या कोंवळ्या
किती गळाल्या फूल पाकळ्या,
वनता उद्याना आली !

कडकड पडतां तरुवर खालीं
निराश्रिता किति होती वेली;
दुर्दशा काय ही झाली !

## मालविका

या आगीच्या पूर्वी जाई
जिवलग माझी स्वर्गी ताई
हा तोष मनाला होई.

जिवंत मृतिचा प्रसंग दुर्धर
अनुभविती किति आज घरोघर
त्यांतून ताइ मम सुटली !

—न. शं. रहाळकर.

---

## ११ वैभव—

( काणिका )

तारका सुमांनीं खुललें वरि अम्बर.
हा वसंत-वायू वाहे किति भिरभिर.
चांदणें पसरलें अवनीवरि निर्भर.
परि अवचित कुठुनी काळे ढग पातले !
चांदणें विधूचें एकाकीं नासलें !!

फल-भारें लवला आम्रतरू उपवनीं.
झोंपल्या तयाला घट्ट लता बिलगुनी.
कुणबीण लागली तदा म्हणूं लावणी.
तों वीज आदळे वृक्षावरि कडकडा !
निमिषांत पसरली बागेवरि अवकळा !!

हें मुलांमुलींनीं भरलें माझें घर.
पुष्पांनीं फुलला प्राजक्तहि सुंदर.
नयनांस कुणाच्या खुपलें हें ' वैभव ' !
हा सुकुन चालला प्राजक्तहि अंगणीं !
बाळांवर पडली काळाची ' गवसणी ' !!

—गोविंद झोकरकर

## १२ सारंगी वाजते—

( कणिका )

वाळकी खाउनी भाकर पाण्यासवें
कशितरी झोंपली मजुरांचीं बालकें.
नी माय तयांची रात्रभरी तळमळे.
परि ' बाळ ' खाइना ' घास ' म्हणोनी कुणी
होमांत तुपाची धार सुखें ओतिली !

कशितरी घालुनी अंगामधिं लक्तरें
थंडींत कांपती मजुरांचीं बालकें.
ते हाल पाहुनी माय अश्रु ढाळते.
परि उंचउंचशा कुण्या हवेलीमधें
मउमऊ बिछान्यावरी ' श्वान ' झोपतें !

साथींत देविच्या मजुरांची बालकें
तडफडून मेलीं—भक्ष देविला मिळे !
नी माय तयांची किंकाळ्या फोडिते
परि उंचउंचशा कुण्या हवेलीमधें
मालका रिझविण्या सारंगी वाजते ! ! !

—गोविंद झोकरकर

## १३ " माणसेंच का गे ? "

(जाति-मोहिनी)

प्रीतिगीत जोडीजोडीं गातिं पाखरें हीं.
सङ्ग सिन्धुसरिता यांचा सदासाठिं राही.
दिवसयामिनींचे जुळले हात नेहमींही.
विरहदुःखिं झुरण्यासाठीं माणसेंच का गे ?

हंसत हंसत पुष्पें त्यजितीं मञ्जु सौरभास.
झुलत झुलत वाहवि फान्दी चन्दनानिलास.
चपळ उडत उडवी ओढा गार तुषारांस.
कण्हत टाकिती श्वासांना माणसेंच का गे ?

नटुनि थटुनि हिरवी खिरवी रात्र तारकांना.
रमत डोलणारी वेली वर्षवी फुलांना.
हंसत ही मधाची धरितीं फुलें धार नाना.
ढाळणार दुःखाश्रूंना माणसेंच का गे ?

गाढ कशी कांट्यांवर ही निजे वेलिबाई
दगडखड्यांवरतीं झोंपे सौम्य सिन्धुदेवी.
गिरीडोंगरीं ही पहुडे स्वस्थ गार राई.
गादिवरी तळमळणारीं माणसेंच का गे ?

## मालविका

श्रवणमधुर वाटे किति हा ध्वनी निर्झराचा.
अङ्गअङ्ग पुलकित करि हा नाद या घनाचा.
वेणुंतून वा वा ! पावा वाजतो हरीचा !
हृदय चिरुनि आक्रोशतिं हीं माणसेंच का गे ?

कुमुद मोदले हे न्हाती रम्य चन्द्रिकेंत.
पुण्डरीक अवघे फुलले दिवसिंच्या उर्बेत.
विश्व रङ्गलें सन्ध्येच्या लाजऱ्या छटेंत.
होरपळुनि दुःखीं निघतीं माणसेंच का गे ?

गरुड जातसे मौजेंनें नील या अनन्तीं.
उदधिचाहि पोहत सहजीं मत्स्य ठाव घेती.
मन्द मन्द विहरत गगनीं स्वैर पवन गाती.
जगिं सुखास धुण्डित शिणतीं माणसेंच का गे ?

—रा. अ. काळेले

---

## १४ तें फूल—हें फूल—

(उपजाति)

[ एका बालविधवेस पाहून ]

तें फूल हांसून नभीं विलोकी,
त्याच्यावरी तों दंव देव टाकी.
हें फूल चित्तीं प्रभु आठवून,
टाकूं बघे त्या पदिं अश्रु दोन !

तें फूल वाचे घटकाच, पाही
त्या जीवनीं तें परि धन्य होई.
हें फूल दीर्घायु सहे बिचारें,
कण्टाळवाणें परि शून्य सारें !

विकासवाया कळि त्या फुलाची
सन्ध्या नभीं रङ्गत सोनियाची.
याला मिटायास नितान्त मात्र
सदाहि मध्याह्न, सदाहि रात्र !

तें फूल माङ्गल्याचि मूर्तिमन्त.
हें फूल ?—हें पाप शरीरवन्त !

संसर्गही पावन हो तयाचा
दुरून लोकांस विटाळ याचा !

तें फूल सन्तोषवि नाक डोळे
हें फूल सर्वाङ्गसुरम्य झालें.
सौन्दर्य उत्कर्ष करी तयाचा
परी अधःपात करीत याचा !

तें फूल मातींतुनि वाढताहे
जाणार तें स्वर्गिं परी खरें हें.
हें फूल ये दिव्य असें वरून
जाणार मातींत परी मिळून !

तें फूल खालीं पडलें कुठेंही
सप्रेम लावी हृदयीं कुणीही.
हें फूल कोणा हृदिं लागलेलें
कुठेंतरी व्यर्थ पडे गळालें !

तें फूल संरक्षित ठेवण्यास
कांटे जणूं कुम्पण कीं तयास ?
हें फूल मर्मांतुनि भेदण्यातें
या आंतबाहेरुनि तीव्र कांटे !

तें फूल आम्हीं खुडिलें विलोल
सभक्ति देवाचरणीं बसेल.

## तें फूल–हें फूल

हें फूल हा ! हा ! प्रभुनें खुडून
या आमच्या पायिं दिलें त्यजून!

तें फूल पायीं लव लागलेलें
विटाळलेलें प्रभुला न चाले.
हें फूल पायींच समाज लोटी
देवा ! तुझ्या हें परि लावि पोटीं.

–रा. अ. काळेले.

---

## १५ हिन्दोला

( जाति–बालानन्द )

[ दिवसाचे तीन विभाग—संध्या, रात्र, प्रभात.

वर्षांतील तीन ऋतु—वसंत, वर्षा, शिशिर.

जीवितांतील तीन अवस्था—बाल्य, तारुण्य, जरा.

म्हणजेच काळाच्या हिन्दोल्याच्या तीन दशा—उंच, खालीं, वर अर्थात् गौरवमय भूत, दुःखपूर्ण वर्तमान व आशामंडित भविष्य ]

गत काळाची मावळली
संध्या पिंवळी फुललेली.
फुलांत सौरभ सांठवुनी
वसंत गेला हांसवुनी.
बाळपणाचें मुग्ध हंसें,
विरून गेलें आज कसें ?
वरती चढलों,
परि हे पडलों,
स्मृतिनें रडलों,
काळाचा निष्ठुर झोला
हिन्दोला ग ऽ हिन्दोला !

## हिन्दोला

रात्र चालली अंधेरी,
चान्दणि चमके चन्देरी.
इन्द्रचाप अश्रू ढाळी,
उदास ह्या वर्षाकाळीं.
तारुण्याचा जोम जरी,
परवशतेचे पाश परी.
    खालीं बसलों,
    असलो निजलों,
    एक गवसलों,
काळाचा निष्ठुर झोला
हिन्दोला ग ऽ हिन्दोला !

येइल का आतां अरुण,
घेउनि आशेची किरणं ?
करील का हा पाचोळा,
बंडखोर वारा गोळा?
चिर शांतीचें सोपान,
जरा–मृत्युचें आव्हान
    जिवास पाशा,
    बांधुनि आशा,
    थोपवि नाशा,
काळाचा निष्ठुर झोला
हिन्दोला ग ऽ हिन्दोला !

—प्र. ब. माचवे.

## १६ काल आणि आज

( शा. वि. )

लाटा येउनि काल जेथ भरती फेंसाळल्या ह्या तटीं
वाळूचेंच अफाट आज पसरे मैदान ही ओहटीं.
कासारीं नभिंच्या जिथें उमलली पद्मावली चन्द्रिका
तेथें अंधुक क्षीण कोर चमके ही आजला वीज कां ?

जेथें पुष्पसुगंध ही विखुरला वेड्या वसंतानिलें
सांगाडे तरुचे जुनाट, घुबडें ओसाड हें व्यापिलें.
सृष्टीच्या परिवर्तना निरखुनी शंका उठे मानसीं
माझ्याही लघुजीवनांत घडणें क्रांती कधीं का अशी ?

--प्र. ब. माचवे.

## १७ आज आणि उद्यां—

( शा. वि. )

झाला निर्जल आज निर्झर जरी ऐश्वर्य गेलें लया,
विश्वासें अनुतप्त बोलवित, कां मेघांसि नाहीं दया ?
झाली अंधुक आज कोर विधुची आली जरी क्षीणता
येणारी न तरी पुन्हां कधिंहि का ती पौर्णिमा हो अतां ?

सांगाड्यांवर पालवी, नि घुबडें जाऊनि ये कोकिला,
प्राण्या हें तव शोकगीत हंसरें केव्हां तरी होइल;
जातो ‘ आज ’ तिथें ‘ उद्यां ’ उगवतो होतें जुन्याचें नव,
हा आवश्यक आजचा विलयही आहे विकासास्तव.

—प्र. ब. माचवे

## १८ आशा निराशा—

गुलाब कलिका आली होती
जेव्हां त्या उपवनीं
आस मग फुलली माझ्या मनीं.

जेव्हां फुलली गुलाब कलिका
हंसें वसें नाचरें
जिवाचीं तीं उडतीं पांखरें.

फुलें गुंफिलीं तीच गुलाबी
प्रेमें कीं बांधिलें
तळें हें हृदयाचें सांचलें.

फुलें विखुरलीं, तंतू तुटले
चहूंकडे सांडले
निराशे ! राज्य तुझें मांडलें.

अशीच आशा करी निराशा
परी न आशा सुटे
जिवाचा बंध कधीं का मिटे !

—आर. एम्. करकरे.

## १९ वचनभंगाचें पाप—

[ मुद्रिका ]

या हो ! या हो ! रसिकां येथें लपा,
शब्द जो बाळपणिं गेला त्याचा हा तोटा नफा !

ती काय सांगते ऐका चोरुनि जरा
त्या तिन्हाईत पांथस्था जो आला तीच्या घरा.

× × ×

( ओव्या )

जिवाचे लागे बांधे !
ठाव नाहीं सख्या भावा,
वाटेच्या मुशाफरा
जाइ जाई दुज्या गांवा !

जन्मोजन्मीचं तें
तळा गेलं अतां पाप,
गुहेच्या अंधारांत
लोपलं रे आपोआप.

चाळवोनी त्याला
    नको ओढूं वरवर,
वाटेच्या वाटसरा,
    दृष्ट जादूची आंवर.

बिळांत झोंपे नाग
    नको घालूं रे फुंकर
चाळवोनी त्याला
    नको ओढूं वरवर.

असावधपणीं
    शब्द गेला कधीं काळीं,
भरल्या संसारांत
    नको फोडूं रे किंकाळी.

झालं गेलं त्याचा
    नाहीं आतां मागमूस !
माझ्या आई गंगे !
    कां रे उकरसी कूस ?

कालवूं विष नको
    भरल्या आतां ताटीं
झालं गेलं त्याची
    कशासाठीं आटाआटी ?

## वचनभंगाचें पाप

सांज झाली तरी
जाइ जाईं दुज्या गांवा
वाटेच्या वाटसरा !
नको साधूं पुरा दावा.

जन्मोजन्मींच्या रे
तुझ्या ऋणानुबंधाची
गोष्ट लांब गेली
वाट पुढील जन्माची.

पुढील जन्मीं आतां
तुझा हिशेब करीन,
गहाण जीव माझा,
मी या जन्मीं पराधीन.

—भा. रा. तांबे.

## २० 'तीच बाळाची बाप तीच आई'

( दिंडी )

( पतीच्या मागें एकाकी अपत्याचा संभाळ करणाऱ्या आईची मनःस्थिती )

छबी बाळाची बघुन थेट तीच
चित्त कोणाचें बावरें उगीच.
दुःख विसराया बाळ कुणा थारा
तप्त जीवाला, बाळ शीतवारा ?

कोण अंगाई थोपटीत बाळा ?
चुंबनाचा कोणास नित्य चाळा ?
कोण कुरवाळी लाडक्या करानें ?
कुणी जीवाचीं मांडियलीं रानें ?

कोण बाळाला मांडिवरी घेई
दृष्टि लावोनी एकतान होई ?
कोण प्रेमाचा पाजितसे पान्हा ?
फुले कोणाच्या साउलींत तान्हा ?

बघुन बाळाचे गोडगोड खेळ
कोण वेड्यापरि घालवीत वेळ ?

## तीच बाळाची बाप तीच आई–

मधुर आशांचें चित्र रचुन आधीं
कोण जीवाची लावित समाधी ?

कुणी बांधियला पाळणा करांचा
जोजवीता वर्षाव हो वरांचा ?
कोण पदराची लावुनिया आड
उभी काळाची मोडण्यास खोड ?

बाळ निजल्यावर आवरून श्वास
एक दृष्टीनें कोण बघे त्यास ?
बघत शोभा त्या गोडशा मुखाची
पूर्वस्मृतिचे मृदुलेख कोण वाची ?

संकटांचे आघात घेत डोई
खडे कांटे रुततात नित्य पायीं
क्षण न करवे परि दृष्टिआड बाळ
बाळ नोहे ती गोडशी सकाळ.

वरुन धैर्याचे बांधुनिया कोट
कोण वरचेवर दाबितसे ओंठ ?
कोण अश्रूंच्या वाहवीत धारा
अढळ जीवाचा आठवून तारा ?

## मालविका

मूर्ति ध्येयाची ठेवुनी समोर
कोण वेळेला होतसे कठोर ?
हृदय वात्सल्यें भरुन जिचें वाही
तीच बाळाची बाप तीच आई.

—वि. ह. आपटे.

---

## २१ कशास फुलसी ?

( चालः—मधुर सुवासिक कुसुमें कोणी. )

कशास फुलसी ? फुला ! एकला वसंत गेला उडून्
खेळगडी रे तुझे लाडक्या नेले अवघे खुडून्.

हंसावया नच कळी जवळीं कुणि, भेटाया कडकडून्
पुसावयाला अश्रु न येई भृंगहि बसला दडून्.

कळ्या हांसऱ्या फुलें नाचरीं जिथें नांदलीं सुखें,
गोड गोडशीं गाणीं गाउनि मधुपें चुंबिलिं मुखें.

गजबजली जी लता अखंडित सौरभ-गुंजारवें;
वैभव जीचें बघुनि गाळिलीं सृष्टीनें आसवें.

तिथेंच एकलकोंडें झुरणें रुचेल कैसें तुला,
विरहाची झळ तव तनु कोमल कुठवर साहिल फुला ?

मधू समर्पुनि मधुपां, परिमल पसरुनि पवनावरी,
विशीर्ण सुमनें पहा पहुडलीं वसुधा-अंकावरी.

फेंक पाकळ्या तूंही निज जा, अपुल्या मित्रांसवें,
प्रेम कराया नुरतां कोणी जिणें कशाला हवें ?

## मालविका

कंठमालिकेमधून माझ्या माणिकमोती-हिरे,
गळतिल जेव्हां अनमोलाचे लाल जिवाचे खरे,

मागोमाग तयांच्या सुमना जाइन मी तुजपरी,
जड जीवाची धोंड कुणास्तव उगाच मिरवूं उरीं ?

जिवाजिवांचीं जीवन हृदयें जातीं जेव्हां झडून्,
भयाण या जगिं भुतासारखें कुणी रहावें सडून् ?

—सी. का. देव.

---

## २२ हरिजनास—

( चालः—निजल्या तान्ह्यावरी. )

धीर धरी हरिजना !
सख्या रे! आंवर आंवर मना. ध्रु०

फेंक दूर ती कुऱ्हाड भाऊ,
हात घणाला नकोच लावूं,
चल लोटांगण घालित जाऊं
राउळांत दर्शना. सख्या रे ! आंवर आंवर मना.

तुझ्या बंधुचीं हृदयमंदिरें
फोडुनि बघशिल आंत काय रे !
काय दयाघन कधीं पाझरे–
शीतल पवनाविना ? सख्या रे ! आंवर आंवर मना.

पहा युधिष्ठिर अभिनव, मोहन,
तुझ्यावरुन ओवाळी प्राण,
करितें भारत सीमोल्लंघन,
सुवर्ण तुज अर्पिण्या. सख्या रे ! आंवर आंवर मना.

घट्ट बंधनें युगांतरींचीं
खोल खोल रुतलीं कीं साचीं,

जरी तटातट तोडायाचीं,
चुकतिल का यातना ? सख्या रे ! आंवर आंवर मना.

कळ शमवाया, व्रण बुजवाया,
झट तूं पोटीं धरुनी माया;
स्नेहानें तव भाऊराया,
भरतिल जखमा पुन्हां. सख्या रे ! आंवर आंवर मना.

ऋषी, तपस्वी, पंडित, ज्ञानी,
कर्मवीर धर्मात्मे मिळुनी,
अनुष्ठान करिती दिन-रजनीं,
तुजसाठिंच आज ना ! सख्या रे ! आंवर आंवर मना.

आतां घडि आली आरतिची,
छबी उघडते जनार्दनाची,
करी तयारी तूं पूजेची,
टाक मलिन भावना. सख्या रे ! आंवर आंवर मना.

—सी. का. देव.

## २३ ‘ मेघास ’

( चाल:—सब से राम भजन कर लेना. )

मन मोहन शाम मुरारी
मेघा ! आठवतो मजला. ध्रु०

कांति तुझ्यासम सांवळि सुंदर
खेळ तुझ्यासम त्याचे.
नाटकि मोठा मेघा ! मोहन
घेतो बहुरूपाला. मेघा—

चुकवुनि त्याला जातों आम्हीं
जल घेण्या तीराला.
येइ तुझ्यासम कान्हा मार्गीं
भिजवुनि जाइ अम्हाला. मेघा—

चिमणा हरि हा होतो मोठा
कैसा, नकळे कांहीं.
ह्याच कृतीनें मोहन मोहवि
भोळी राधा बाला. मेघा—

श्याम-तनूला कटी मेखला.
चपला शोभे तुजला

इंद्रधनूसम कंठिं विराजे
वनसुमनांची माला. मेघा—

पांवा वाजवि कुंजवनीं हरि
मोहनि घाली सकलां.
मंजूरव तव वनीं नाचवी
मोदानें मयुराला. मेघा—

गोपि गोकुळीं दुःखी म्हणुनी
शांतविण्यास तयांनां
पाठविलें कां सांग हरीनें
गोकुल सुखवायाला. मेघा—

मथुरे गेला अम्हां विसरला
दुःखें दुःखी आम्हीं
सांग हरीला निरोप अमुचा
भेट सख्या मनमोहना. मेघा—

—कृष्णाबाई वैशंपायन.

## २४ राधा-माधव-विनोद—

( चाल—भीमक बाळा )

हृदय–मोहना !
नंद–नंदना !
धांवत, नाचत येसि गडे !

तुज भेटाया
हृदयिं धराया
उत्कंठा बहु मना जडे !

देवी रजनी
नभःप्रांगणीं
उडु-पुष्पें तीं उधळित ये !

तिज भेटाया
शशांकराया
कशा येइ हा पहा स्वयें !

ह्या दासीचा
नच इतरांचा
हक्क तुजवरी पुरापुरा !

## मालविका

तुझ्यावांचुनी
उभ्या त्रिभुवनीं
नसे कुणीही मज प्यारा !

क्षणांत दिससी
क्षणांत लपसी
अभिनव चंचल तव लीला !

गुंग होउनी
बघतां नयनीं
पडे भूल मम हृदयाला !

किती निष्ठुरा
पाणउतारा
असा सारखा करतोस ?

रडेन अथवा
धरीन रुसवा
आतां तुजवर मी खास !

ही सुममाळा
तुज गोपाळा !
गळयांत घालाया केली

तिज अवमानी
पद्दा म्हणोनी
कोमेजाया ती आली !

रागव मजवरि
खुशाल श्रीहरि !
परी हिच्यावर दया करी.

मुकी बिचारी
शुद्ध अंतरीं
म्हणुनि झडकरी स्वीकारी !

विलंब आतां
हे यदुनाथा !
निमिषमात्रहि करशील,

तुझी राधिका
पहा बरें कां !
प्राण आपुला सोडील !

थांब नाहिंतर
तुला यदूवर !
मीच काढिते हुडकोनी

दिसे न बाई
कुंजीं याही
गेला कीं गे ! तो पळुनी !

पळसी कोठें
मींहि·पाहतें,
धरितें तुजला बघ आतां.

काय इथेंही
मुळींच नाहीं !
कोठें लपसी यदुनाथा !

गेला बाई
कुठें तरीही
मला फसवुनी तो कान्हा !

बहू भागलें
हताश झालें;
कुणी तरी हो त्या आणा !

विरह तयाचा
मजला साचा
असह्य होतो; कृपा करा !

झणीं माधवा
मला भेटवा
येऊं द्या मनिं कींव जरा !

असें वदुनि राधिका विकल होउनी भूवरी,
क्षणांत पडणार तों प्रकटुनी हरी सांवरी,
पुसे मृदुवचें तिला" वद, विनोद केला कसा ?"
" म्हणूं प्रिय कसा गडे ! मुळिं न " बोलली राजसा

—कृ. गं. कवचाळे.

## २५ " प्रेमा न लगे मुळिं कारण तें !"

प्रेमा न लगे मुळिं कारण तें ! ध्रु.

कुठें चंद्रिका ! सागर कोठें !
येति उमाळे परि त्या मोठे !
बघुनि येइ कां त्या भरतें ? प्रेमा न.—

मेघ अंबरीं, मयुरी भूवरि !
बघुनि तया परि मुदें नृत्य करि !
काय तिला वद मोदवितें ? प्रेमा न.—

प्रश्न कासया तरि हा मजसी ?
प्रेमाचें कां कारण पुसशी ?
अवगत काय नसें तूतें ? प्रेमा न.—

त्रैलोक्यश्रीमंत तूं हरी !
राधा ही तव दीन किंकरी !
चिंतनिं तव परि नित रमते. प्रेमा न.—

विस्मरला तूं या दीने जरि !
विस्मरणें तुज शक्य न मज परि !
मूर्ति तुझी हृदयीं वसते ! ! प्रेमा न.—

“ दीन राधिका माझी ! ” ऐशी
असो भावना तव, गुणराशी !
नलगे कांहीं यापरतें ! प्रेमा न.—

—वा. रा. बोकील.

---

## २६ नयनीं भरलें तुझें रूप !

( चाल—मसि बोलुं नको. )

काशि विसरुं तुला गोविंदा !
नयनीं भरलें तुझें रूप !! ध्रु.

किति नाना रूपें धरिसी,
फसवाया या दीनेसी
तव विफल यत्न, गुणराशी ! नयनीं भरलें—

कमलांत जाउनी लपसी,
डोलविसी त्या हंसवीसी,
परि कां हें दिसत न मजसी ? नयनीं भरलें—

पिकहृदीं जधीं तूं शिरसी,
गायनीं स्फूर्ति त्या देसी !
त्या गानीं दिससि, दयाळा !! नयनीं भरलें—

निःस्वार्थि देशभक्तांचें
हृदय रम्य मंदिर साचें !
मंदिरिं त्या वससि, दयाळा !! नयनीं भरलें—

किति सांगु तरी, तूं सदया !
व्यापिसी अवघिया ठायां !
हृदयीं तूं वससि सदा ह्या !! नयनीं भरलें—

—बा. रा. बोकील.

## २७ तुम्ही कसे ?

( चाल—डोळे तुमचे )

कळलें हें मला नसे, प्रियकरा तुम्ही कसे !

मधु मधुरशा बोले, हृदयींचे भाव ओले
पाझरवा जादूवाले, तुम्ही जीवाचे गोडसे.

मजकडे लावा दृष्टी, झाली गडे नवी सृष्टी
अमृताची गोड वृष्टी, डोळ्यावाटें होत असे.

पहिलाच स्पर्श बाई, अंगीं भिनुनीया जाई
माझें मज भान नाहीं, केलें तरी काय असें ?

लोहचुंबकाच्यापरी, ओढ दोघा जीवां भारी
दिसायाला दोन जरी, एकजीव झालों कसे ?

पाय लागे परीसाचा, लोहदेह सोनीयाचा
देहभाव या जीवाचा, तोही गडे आतां नसे.

तोडूनीया सारे बंध, झाले नाथा ! अनिर्बंध
परी जीवा एक छंद, तुमचेंच लागे पिसें.

## मालविका

जीवाशिवा झाल्या भेटी, मी-तूंपणा विरे पोटीं
परी स्फुरे बोल ओठीं, 'प्रियकरा तुम्ही कसे'?

अधराचें पान केलें, विषयाचें विष नेलें
दंशें अमृत वोपिलें, पालवले भाव तसे.

हरूनीया आधीव्याधी, पटवीली गोष्ट साधी
माझ्या जिवाची समाधी, तुम्हांमधें लागतसे.

तुम्हांवरी या जीवाची, देह बुद्धी मन यांची
कुरवंडी करायाची, हाच भाव मनीं वसे.

भाव सांगाया जीवाचा, जडदेहा फुटे वाचा
कण कण या देहाचा, थयथया नाचतसे.

–वि. ह. आपटे

## २८ एकला राहु कसा ?

( प्रणय-प्रभा )

सखि मीच एकला राहु कसा ? ध्रु.
तुजवीण तळमळें मीन जसा

घोर तिमिर तुडवोनी पायीं,
उषा धांवते घाई घाई,
सहस्रकरकरिं विलीन होई,
जग स्तिमित बघे त्या प्रणयरसा.

कड्यावरोनी उड्या घेउनी,
कंदर प्रस्तर फोडुनि तटिनी,
निजमुख अर्पी सागरवदनीं,
अनिरुद्ध प्रीति निज लावि कसा.

वनवल्लरि वेष्टी वृक्षाला,
तनुवरि त्याच्या घेई झोला
गुंफुनि घालि किती तरि माला,
हा खेळ न कोणा करिल पिसा !

गिरिवर अंबरिं कुणा चुंबितो ?
पवन कुणाशीं नित कुजबुजतो ?

# मालविका

मेघ कुणाला उरीं कवळितो ?
कुणि दिसे न कधिं एकटा असा.

म्हणती शंभु स्मशानवासी,
तोहि गुंतला गिरिजापाशीं,
अर्धनारिनर नटतो हौशी,
पण वैराग्या कुणि न हंसा !

तर मग मानव मी संसारीं
राहुं कसा निश्चल अविकारी,
अनुरागांची जरि न खुमारी,
कां न गमावा भव विषसा ?

ये, ये, सखये ! अडचण कसली ?
भीड कुणाची घेउन बसली ?
छे, भलतें ! तूं नसशिल रुसली,
प्रेमपूर्ण तव नसा नसा.

शून्य तुझ्याविण सगळें, सजणे,
तूं मी मिळतां विश्व ठेंगणें,
हवीं तशीं मग घालुं रंगणें,
तुजसाठिंच जगतो कसाबसा !

—सी. का. देव.

## २९ कार्तिक-स्नान—

(राग—सोहनी, ताल-त्रिताल.)

ये पहांटचा तारा गगनीं
कुणिकडे निघसि लगबग करुनी ? ध्रु.

प्रथम कुठें आरवे कोंबडा,
सुरूं न झाला अजुन चौघडा,
काक एक जागला निसुरडा,
खांकरी कुठें तरि वृद्ध कुणी !
कुणिकडे निघसि लगबग करुनी ?

अजुनि रात्रही देइ जांभया,
घरोघरीं मिणमिणती समया,
निघसि झुंजुमुंजू या समया !
वाटे न भीति कां तुज तरुणी ?
कुणिकडे निघसि लगबग करुनी ?

शुक्राची चांदणि झळके वरि,
भूवरिची चांदणि तूं कुमरी,
तुझी न येई तिला सर परी !

## मालविका

लागेल दृष्ट तुज गे रमणी !
कुणिकडे निघासि लगबग करुनी ?

" वेळ घालवूं नका हटकुनी,
गांठायाची मज पुष्करिणी,
वनीं कार्तिक-स्नान करोनी,
सूर्योदयिं मज येणें फिरुनी
कुणिकडे निघासि लगबग करूनी ?

वेळ चोर-जारांची ही तर,
कुणी सोबतिण नाहिं बरोबर,
मिळेल का त्या वनीं खरोखर
या समयिं सोबती तुला कुणी ?
कुणिकडे निघासि लगबग करुनी ?

—भा. रा. तांबे.

## ३० स्वागत—

( गजल )

व्यर्थ गे शिणलीस माझ्या
स्वागतातें एवढी,
प्रेम का येरांत कोठें
लोभलें वेडे, कधीं ?

हांसरीं नाना फुलें हीं
थाटलीं तूं मन्दिरीं,
गोड गे याहून आहा!
हास्य तूझें सुन्दरी.

गौर गोण्डस गे तुझ्या या
वेढल्या बाहूपुढें
फूलहाराचें रहावें
काय भूषण बापुडें ?

स्थान मिळतां श्रेष्ठ तूझ्या
देवि, हृत्सिंहासनीं
कां बसूं निर्जीव उसन्या
सजविल्या या आसनीं ?

## मालविका

काय सर्व उत्स्या सुगन्धी ?
काय उंची अत्तरें ?
त्वन्मुखोच्छ्वासांत झाला
धुन्द जो त्याला वरें ?

मधुसुधेचा गोड पेला
अर्पिसी मजला असा,
भागवूं त्यानें कशी पैं
ही तवाधरलालसा ?

नील या त्वल्लोचनीं जी
तेवते प्रेमद्युती
लोपते नीराञ्जनींची
तीपुढें ही आरती

प्रेमले ! म्हणतेस ‘ या या ’
येउं कोठें, भ्रान्ति ही
शपथ गे, होतोंच तुझ्या
सन्निधीं विरहांतही !

—रा. अ. काळेले

## ३१ सागराला मौक्तिकांचा दिव्य ठेवा लाभला—

[ गजल ]

सागराला मौक्तिकांचा
दिव्य ठेवा लाभला,
कीं नभाच्या पोटिं ठेवा
तारकांचा सांठला.

शांत माझ्या मानसीं हा
काय सांठा कोठचा !
कल्पनेचा भावनांचा
तो उबारा प्रीतिचा.

थोर सिन्धूहून आणी
थोर आकाशाहुनी,
थोरवी मन्मानसाची
भासते दोहींहुनी.

रम्य पाणी मौक्तिकांचें
तेज तार्‍यांचें तसें,
वेड भासें प्रीतिचें तें
प्रेमपाशीं औरसें.

## मालविका

जीव माझा दान द्याया
तूज बाई सारखा,
भाव माझ्या मानसाचा
कां ठरावा हा फुका ?

ह्यन्निधी हा तूजसाठीं
कां पुन्हां हें सांगणें !
सांगण्याला तेंच तें कीं
वाहिलें मी हें जिणें !!!

—विलय

---

## ३२ जादू—

कां विलोल नयनीं स्वर्ग दिसे ?
काढितां दृष्टि जग शून्य दिसे ध्रु.

जीवनवल्ली या जगताची,
प्रणय-प्रतिष्ठा कीं मदनाची,
उषा हंसतमुख खिन्न जनांची,
सुरम्य नयनीं काय दिसे ?

बाळघुटी जी मदना केली,
उषा कपोलीं सांडुन गेली,
ओघळुनी ती अधरीं स्थिरली,
प्रणयराग मग लावि पिसें !

एकाग्रीं मन अविरत खिळतें,
घड्याळ वाटे पळतच सुटतें,
कर्तव्योन्मुख बुद्धि विनविते,
दृष्टि परी ती खिळुन बसे !

स्मृति नच लोपे कुठेंहि भटका,
झोंपेंतहि ती कधिं नच सुटका,

## मालविका

उठतां बसतां एकच चटका,
स्मरणमात्र !—मनिं चरकतसे !

" स्मरलोलुपता रुचते कां मनिं ? "
खुशाल होवो कान उघडणी
भिडे जरी ती नजर जहरिणी
ब्रह्मदेवही झुरत बसे !

काळें मौक्तिक कोण लुकवितो ?
मदन बिचारा अंध भटकतो !
घाव जिव्हारीं कोठुन भिडतो ?
जिते खून कुणि पाडितसे !

एक पळाची जादू केवळ !
धैर्यमेरुच्या हृदयीं खळबळ !
तनुची लाही, तळमळ तळमळ !
पाहुनि हें कुणि गालिं हंसे !!

—य. खं. कुळकर्णी

## ३२ रहस्यगीत—

यामिनी जणुं कामिनी
यौवनीं मृदुहासिनी
मञ्जु मञ्जु सलील पाउलें पातली जनमोहिनी.

दङ्ग या शशिसङ्गतीं
तारका रमणी किती
गे, कुठेंतरि दूर चोरुनि चालल्या शृङ्गारुनी.

एकमेका सोबतीं
लोल लहरी या किती
नाचत्या हळुंवार वारिधिपार जाति विलासिनी.

गोड ही किति बांसरी
वाजवी बागेसरी
अन्तरान्तरिं पोहते ती रागिणी अनुरागिणी.

मलयवायु बरोबरी
मन्द मन्द उठे वरी
आसमन्त वसन्त-सौरभ या अनन्त दिशांतुनी.

## मालविका

वेळ ही बघ साजणी
विश्वगौप्य हिच्यांतुनी
मी असा नी तू अशी नी रात्र ही अशि चांदणी.

लाडके, सुमनाहुनी
मृदुल पाउलिं ये झणीं,
येंच, दोघी गुपचिपी चल, जाउं दूर घनी वनीं.

—रा. अ. काळेले

---

## ३४ प्रीत अशि जडली—

( चाल–मुशाफिर आम्हीं

"I love you. beloved, Forgive me my love"
RABINDRANATH TAGORE
'Gardener.'

प्रीत अशि जडली, जडलि तुझ्या ठायीं
क्षमा कर विनंति ही पायीं.

पांखरावाणी, वाणि वाट चुकुनी
वागुरीं गेलें मी फंसुनी

थरक हृदयांत, हृदयांत थरक भरतां
गळालें वसनाचि तें आतां

दयेचा शेला, शेला पांघरवी
क्षमा कर जडालि तुझ्या ठायीं

जरी ना करवे, करवे रे ! प्रीती
क्षमा कर कळा जरी उठती.

वटारुन डोळे, डोळे तूं दुरुनी
डागण्या देउं नको हंसुनी.

## माळविका

परत पाउलिं मी, पाउलिं जाईन
कोंपरा धरून राहीन.

करीं मी दोन्ही, दोन्ही झांकीन
लाज निज, काळोखीं बसुन.

फिरव मुख अपुलें, प्रेम जरी नसलें
क्षमा कर शल्य जरी रुतलें.

तुझी जर जडली, जडलि खरी प्रीती
क्षमा कर उकळ्या जरि फुटती.

सुखाचा पूर, पूरहि भरपूर
येतां लहरीवर लहर.

हसुं नको सखया, हर्षवायु म्हणुनी
भयद ही निसंगता बघुनी.

होउनी राणी, सिंहासनिं बसुनी
गाजविन जुलुम हुकुम करुनी.

देवतेसम मी, देतां वरदान
क्षमा कर भरतां अभिमान.

अशी तोऱ्यांत, तोऱ्यांतच डुलतां
क्षमा कर सुखातिशयिं फुलतां.

—ग. न. पंडित

## ३५ स्वप्न-गगनिं मम, घन सायंतन—

[ राग—पटदीप, ताल—त्रिताल. ]

" You are the evening cloud floating in the sky of my dreams. "

RABINDRANATH TAGORE
'Gardener.'

स्वप्न-गगनिं मम, घन सायंतन, तूंच तूंच गे ! असासि तरंगुन
प्रेमाशारंजित कर फिरवुन
नटावि तुला बहु रंग रुपांतुन
माझिच गे ! माझिच तूं साजण, वससी अनंत स्वप्नांवलिंतुन.

हृदयाच्या अनुरागीं रंगुन
चरण तुझे खुलती किति आरुण
माझिच गे ! माझिच तूं साजण, संध्यागीत फुलांची माळिण.

क्लेशाची मम वारुणि दारुण
मधु कटु ओंठ तुझे, ती प्राशुन
माझिच गे ! माझिच तूं साजण, स्वप्नीं एकांतिक मम विहसन

## मालविका

मम तळमाळिची छाया बिंबुन
श्यामल झाले सखि! तव लोचन
माझिच गे! माझिच तूं साजण, नयनाच्या डोहीं संचारुन.

गीतजालिं या तुजला गोंवुन
ठेविलें अतां पुरतें वेढुन
माझिच गे! माझिच तूं साजण, वससी माझ्या स्वप्निं चिरंतन.

—ग. न. पंडित.

---

## ३६ तुला प्रीतिची कदर नसे !

शान्त कान्ति रमणीय दिसे
निशि–वासर सङ्गम विलसे

अपुलीं वचनें
तुवां बदलणें
तुझें तुला हें शोभतसे !

आकांक्षांनीं
गगन चुम्बुनी
हताश व्हावें अन्ति कसें ?

जुलुमी राणी
उंच झोंकुनी
भाग्य, दाविसी कसब असें !

'बरें' म्हणूं कां ?
स्वस्थ बसूं का ?
तुला प्रीतिची कदर नसे !

—भालचंद्र लोवलेकर

## ३७ गोड समस्या—

( वृत्त–पांडव )

गोड आशा कां कळेना अंतरीं घोंटाळते
कोणती संवेदना हृद्सागरा हेलावते ?

मानसाच्या या तटाकीं भावना–लहरींवरी
त्वन्मुखाची चंद्रिका ही कां बरें आंदोलते ?

मोतिया रंगांतली ती वेषभूषा पाहुनी
कां उषेच्या संभ्रमीं चंडोल–मानस गुंगतें ?

मंद हास्याची प्रभा तव आननीं गे फांकतां
शारदीया कौमुदी कां अंतरंगीं थाटते ?

गूढ भावें निर्मिलेली चोरटी शंका गडे
का विचारूं तूस ? रागावूं नये तूं वाटतें.

भाववल्लीचीं सुमें या भाग्यवंतालाच का
ठेविशीं अर्पावयाला त्वत्कपोलीं ? देवते !

—पराग

## ३८ सवत—

कविता न सवत ही कला
पाण्यांत पाहते मला— ध्रु.

जरि तिचा आधिंचा लळा
क्षण रुचे न तिजवेगळा,
मग कशास माझा गळा
यांनीं ग असा फसविला; पाण्यांत.—

कुजबूज सारखी सुरू
बोलते जीभ चुरुचुरु
लेखणी लिही कुरुकुरु
पाहुनी जीव भागला; पाण्यांत—

कविता छे ! दारू खरी
लागली चटक त्या पुरी
धुंदींत बरळतीं घरीं
मोहिनीमंत्र घातला; पाण्यांत—

उद्दाम किती वागते
कानास सदा लागते

रात्रिची नित्य जागते
सूड कीं पुरा घेतला; पाण्यांत—

मी बटीक यांची जशी
कीं मानेखालिल उशी
वा उष्टवली कपबशी
मज सदा हुकुम गाजला; पाण्यांत—

मी साधी ती मोहक
मी भोळी ती लाडिक
मी गरीब ती झकपक
त्यांनींच डाव साधिला; पाण्यांत—

नाचते, मुरडते किती
हांसते, ठुमकते अती
बिजलीच जशी चमकती
पुरताच फांस टाकिला; पाण्यांत—

जणुं उष्टी पत्रावळ
कीं धुरकटली धावळ
वा रानांतिल बाभळ
समजती मला आजला; पाण्यांत—

सवत

ती उष्टी मी निर्मळ
ती उठवळ चोखंदळ
ती खट्याळ, मी सोज्वळ
दावीन तया दाखला; पाण्यांत—

बगलेंत घेउनी कुणी
जो फिरे तो तिचा धनी
शिवली न लाज तिस मनीं
ती आवडती त्यांजला; पाण्यांत—

लग्नाची मी नावडे
माझेंच तया वावडें
नटवीहि नटी आवडे
प्रारब्धभोग आपला; पाण्यांत—

—वि. द. आपटे.

## ३९ 'आलिस का आंगणीं'?

तुला पाहुनी दिलखुष हंसतो 'हम्मा' उच्चारुनी
नसे घरिं आलिस कां आंगणीं ?

येतां तुज गोग्रास चारि जी प्रेमें मम कामिनी
नसे ती आज इथें नंदिनी !

कटिवर घेउन बाळ तयाच्या हातीं तुजलागुनी
थापटित होती गोंजारुनी.

हट्टि बाळ मम घांस चुकवितां, आमंत्रण धाडुनी
ताटिंचा घांस देइ काढुनी.

आज नसे घरि गृहलक्ष्मी ती, घरचा चिंतामणी
जा! जा! गाई, अतां परतुनी.

दूर दूर किति 'ती' अन् तान्हा दूर किती येथुनी
न कळे येतिल कधीं परतुनी.

चिंव चिंव चिमणी! गोजिरवाणी, कशास इथ येउनी
बसशी ? आस कशाची मनीं ?

## आलिस कां आंगणीं

निसतां तांदुळ देत होति ‘ ती ’ दाणे तुज टाकुनी
आज घरिं कोठारें गे सुनी !

टिपतां दाणे, अजाण बालक धरावया रांगुनी
होतें किति गे हंसवित गुणी !

बाळाची मम पंगत अडतां, चिउ ! तुज बोलावुनी
तिनें ग ! बसवावें भोजनीं.

करुनि ‘ हात ग ’ ! काधिं उडवावें बाळा समजावुनी
लोटले मास किती जाउनी !

भुर्कन जाउन येशिल कां तूं कुशल खबर घेउनी
केल्या उपकारां जागुनी ?

—ग. न. पंडित

## ४० जा ! बोलुं नका !

" जा ! बोलुं नका ! " –हें म्हणासि जरी !
तरि कां न जिभेवर फिरव सुरी   ध्रु.

कृपाकटाक्षा कधीं फेंकाशिल ?
शद्व मधुरसा कधीं बोलशिल ?
कधीं प्रीतिनें बघुन हांसशिल ?
ही आशा दडली हृदन्तरीं !   जा ! बोलुं—

माझ्या या बघ हृदय-सागरीं
नृत्य करिति तव प्रीती-लहरी
जीवन-नौका झुले तयावरि
फुटेल तुजविण ती खडकावरि !   जा बोलुं—

आणिक मजला म्हण कांहींही
भरुन विषाचा पेला देई
खुशाल प्राशिन जणूं सुधा ही
ती करिल अमर मज जनांतरीं !   जा बोलुं—

जन्मजन्मिंचें ध्येय उराशीं
बाळगलें तें तूं गुणराशी

जा ! बोलुं नका !

दंडक कां हे असे घालिशीं ?
कां तीक्ष्ण खड्ग नच धरिशि शिरीं. जा बोलुं—

छायेमागें धांवत जातां
भाल फुटे भिंतीवर धरितां
तशी नव्हें ही प्रीतीसरिता
चल मारुं बुडी ये कल्पवरी ! जा बोलुं—

—ना. वा. केळकर

———

## ४१ ‘निशिदिनीं थट्टा किति करितां !’

(चाल—वसंतीं बघुनि मेनकेला)

“निशिदिनीं थट्टा किति करितां !
काळ वेळ ना शोभतसे कां, तुम्हां हें आतां ?”

“नसे मम सर्व दोष तुझा
भ्रमर भ्रमे जरि कमलिनिभंवतीं काय दोष त्याचा ?

संयमें वागाया जाई
रुचिरे ! परि तव मूर्ती दिसतां भान नुरे कांहीं”

“नुमजे वच हें मज नाथा !
पुरुष जरी मी असते, तरि हा अनुभव मज येता”

“स्वच्छंदानें खेळाया
जातां माधव त्याला अडाविशि बोल कां ग वाया ?

करींचीं कामें टाकोनी
घेशि चुंबनें अगणित त्याचीं हृदयीं कवळोनी.

किती तूं देशि तया त्रास
हवें नको कां पुसलें कधिं तरि त्याच्या हृदयास ?

बघसी काळ वेळ कां ती ?
बोल गप्प कां, शंका आतां गेली तुझि ना ती ?"

" खुळी मी उत्तर मज नच ये."
" वेडी खचितचि परी लाविसी वेड मला सखये ! !"

—सौ. इंदिराबाई सोहनी

## ४२ घांस—

(प्रणय-प्रभा)

ही पदर सांवरी नावि नवरी
पङ्गतींत उचलला घांस करीं.    ध्रु.

वेढि विरोद्यावरी लाविली
अचल नजर गहिरी गहिरी.
पाजळते हळु समोर समई
रंगवेलिच्या कितिक परी.

मणिबन्धावर पिंवळें कंकण
कञ्चुकि रुन्द जरी किनरी
पाठराखिणी कुजबुज कानीं—
‘ नवा उखाणा निवड करीं ’

मनांत उसळे हौस आणखी,
त्वरा करिति जन परोपरी.
स्तब्ध चित्रवत् आतुर श्रवणीं
सर्व थांबले एक सरी.

## घांस

अधरीं दावी पदर-किनारी
हात धजे न मुळींहि वरि.
घालणार तरि घांस कधीं ही ?
लाज कशाची खूण खरी ?

अधरीं येउनि शब्द घुटमळे
नव प्रेमाची जादुगिरी !

—भालचन्द्र लोवलेकर.

---

## ४३ खंडिता—

( सुनीत )

होता दंग अतीव काव्यरचनीं, चाले त्वरें लेखणी
झाली ती प्रतिभा प्रबोधित तदा स्फूर्ती तशी जागृत.
येती काव्य-सुकल्पना त्वरितशा तैं खंड कैसा पडे ?
शब्द-ब्रम्ह-समाधि ! भान कुठलें; कोणा जगाची क्षिती ?

आलें कोण ? हळूंच दार उघडी, डोकावुनी पाहतें
मेघांच्या पटलासि सारुनि नभीं येई जशी चांद्रिका.
शब्द-ब्रम्ह-सुखांत रंग भरला, केव्हां प्रिया पातली–
त्यातें ज्ञात न; काव्य-कामिनिसवें क्रीडा करी निर्भर.

टाकी पाउल मंजु मंजु पुढती ना नाद त्याचा निघे.
गेली ती लडिवाळ फार जवळी, अज्ञात त्या शाहिरा.
पाहोनी रममाण वल्लभ तदा वेगें निघे मानिनी,
साहे केंवि कशी सुखा सवतिच्या ? होती जरी प्रेमला.

× × × ×

पाहीना फिरुनी वळोनि रमणी, वेगें निघे बाहिर–
मेघापासुनि दूर जाय चपला हो क्रुद्ध ती खंडिता.

—द. ल. अडौणी

## ४४ लतिका—

( सुनीत )

लावाया लतिकेस या न महिने झाले अजुनी दहा,
तों झाली तनु पुष्पिता विकसिता, शोभा अपूर्वा पहा !
डोले ती नवयौवनें मदभरें याया फळें लागलीं
झांकी मत्तनु पल्लवान्तरिं तिची ही सांवळी सांवली.

गाढालिङ्गनिं ती मला कवळिते लागो मला ना झळ !
घेते ताप शिरीं समर्पुनि मला छाया तिची कोमळ.
पुष्पांच्या सुपराग-मञ्चकिं बसे शाखाश्रयाखालते,
आनन्दें करपल्लवां वळवुनी मन्नेत्र ती झांकते.

खेळे खेळ अनेक ती मजसवें वायूसवें मानिनी !
हाले चञ्चल अञ्चलासह तनू सारी मनोमोहिनी.
होती हे सुम-गुच्छही तरलित स्पर्शें कसे वायुच्या,
प्रेमाचे मृदु हे कराञ्जलिमधें झेलेच किंवा तिच्या.

चाले नर्तन, मुग्धगान नयनीं दोघांचिया मानसीं
पुष्पें वर्षति, हर्षत्री उभयही चित्तैक्य होतां रसीं.

—रा. वा. पंतोजी.

## ४५ आईची आठवण—

(ओंव्या)

जडली हिरकणी
    सोनियाच्या ग ! कोंदणीं,
मोला झाली दुणी
    आई तुझी ग ! करणी.

सासू-सासऱ्याचं
    घर दीरा नणंदाचं,
पृथ्वीच्या मोलाचं ग !
    लेणं दिलं भ्रताराचं.

मायेच्या माझ्या माये !
    तुवां जोडली ग ! जोडी,
सुरीं सूर लावूं
    तुवां लाविली ग ! गोडी.

सूर सुरीं, झालं
    संसाराचं गोड गीत,
मायेच्या माझ्या माये !
    तुवां लाविली ग ! रीत.

## आईची आठवण

फळा आली भालीं
   तीट मायेच्या हाताची !
भरलं घर आई !
   किलबिल पांखरांची !

भरलं घर माय,
   अंगण झालं थोडं,
दुडु दुडु धांवे
   लेंकरांचं खेळ घोडं.

राज्य गादीवरी
   काढीं तुझ्या आठवणी,
फळा आली माये
   मायेची पाठवणी.

उचकी लागे माय
   कांहीं केल्या राही ना !
काढिशीं आठवणी ?
   सुखी माय, तुझी मैना.

—भा. रा. तांबे

## ४६ बेबी—

( वृत्त-दिंडी )

नेत्र दोन्हीं जणुं तारका नभींच्या,
केस कुरळे जणुं बटा रेशिमाच्या,
गाल हंसरे; पाकळया पंकजाच्या,
दांत इवले जणुं कळया मोगऱ्याच्या.

अशी बेबी मम सान गोड पोर,
मुग्ध लीला त्या तिच्या मला प्यार,
चुंबचुंबोनी तिच्या गोड गालां,
नित्य भुलवी मी त्रस्त–मानसाला.

घरीं येतां साहून कष्टभार
तिच्या हस्तांचा पडे गळा 'हार'–
संसृतीच्या यातना तापदायी
तिच्यासंगें साहण्या धीर येई.

कधीं कानीं पडतांच गोड गान
जाइ बेबी विसरोनि देहभान
आणि काढी ती कधीं तेच सूर
तिला गाण्याचें वेड असे फार.

कधीं दारीं पाहोनि पांखरांना,
मूठ धान्याची वाहि ती तयांना,
आणि घेवोनी पाटि, पेन, हातीं
पाठ घेई " श्री-ग-णे- " चे कधीं ती.

आइसंगें ती दिवेलागणीला
रोज जाई मंदिरीं ' दर्शनाला.'
आणि पुष्पांचे सांठवोनि घोंस,
वाहण्याची देवास तिला हौस.

कुणा वाटो तो गर्व कीं धनाचा,
कुणा वाटो तो मानमान्यतेचा,
आणि कोणाला गर्व तो कुळाचा,
मला आहे तो मात्र या फुलाचा.

पायिं तुमच्या प्रार्थना एक देवा !
जन्मजन्मीं सहवास तिचा द्यावा !!

—गोविंद झोकरकर.

## ४७ लीला—

सकाळ झाली, झांप उडोनी लीलेचीं लोचनें
रत्नमाणकांपरी विकसती शुभ्र दीप्तिच्या गुणें !

हस्तद्वय नाजूक सारतें विसकटल्या कुंतलां
गोड गळ्याची पुंगी नागापरी भारवी मला !

दुपारची ती रुक्ष वेळ ! परि लीलेचें हांसणें
कर्णपथीं ये वाहत मंजुळ, तें दुडदुड धावणें !

प्रौढ मंडळी शयनीं मग्न, गृहांतरीं स्तब्धता;
कोण संचरे ही भंवतालीं जणूं स्वर्ग-देवता !

सायंतारा नभीं उगवतां दीपासन्निध अहा !
मृदुल करां जोडूनि उभी ही लीला माझी पहा !

परमेशाचें रूपचि अवघें दिसते त्या मूर्तीत
प्रभा वदनिंची तळपतांच मी स्थिरे दृश्य पाहत !

रात्रीं तारा किती पहुडती विशाल त्या अंबरीं.
माझी तारा सुखे पहुडली सान बिछान्यावरी;

किती उराशीं ओढूं तिजला ! घ्यावीं किति चुंबनें !
तिच्यासंगतीं झालें माझें अमृतमय कीं जिणें !

—बा. ना. पेंढरकर

## ४८ हें सांग कशानें होई ?

( चाल—उद्धवा शांतवन कर, जा ! )

घागऱ्या वाजती पायीं, शोभती कडीं हाताला
डुलतात डूल कानांत, तो मोहन धांवत आला
वरचेवरि पाही मागें, घातली मिठी जननीला
तों येउनि भाऊ बोले
" बघ आई कैसे केलें
मी लिहिलें सर्वहि गेलें
सांडिली इथें ही शाई, कर ह्याचे भरले पाहीं "
ताडण तरि करवत नाहीं, हें सांग कशानें होई ?

हा करितो किति नासाडी, तरि कोणि न मारिति ह्याला
चुंबावें हृदयीं धरुनी, ही शिक्षा ठरली त्याला
थोडा जरि करितां दंगा, तैं बाबा म्हणति अम्हाला
" दूध करा ह्याचें बंद
मागवूं नका 'आनंद'
अकलेचा नाहीं गंध "
मुळिं फिकिर न त्या त्याचीही, हें सांग कशानें होई ?

## मालविका

ताईनें अपुल्या परवां, मुंफिलि किति सुंदर वेणी
डोक्याला घालुनि बसतां, हा गुलाम ये मागोनी
वेणींतिल ह्यानें सारीं, टाकिलीं फुलें तोडोनी
राग़ानें उठली ताई
परि राग विसरुनी तीही
तच्चुंबन कितिदां घेई
कां राग न त्याचा येई, हें सांग कशानें होई ?

अक्काची धरुनी वेणी, घोडा हा करि दांडोबा
ती म्हणे नकोरे बाबा, हा चिडवि 'नतोले बाबा'
कोणाच्या हातीं कांहीं, सर्वांवरि ह्याचा ताबा
तरि कोणि न भरती रागें
हा जें जें कांहीं मागे
तें त्याला देती वेगें
ह्या ठावे जादू कांहीं ! हें सांग कशानें होई ?

—सौ. इंदिराबाई सोहनी

## ४९ ‘ गेलि कुठेंतरि आई ? ’

(जाति—वधूवल्ली.)

सांग ना ताई,
अशि गेलि कुठेंतरि आई ?

“ काल तिला तर उठवत नव्हतें,
म्हणती ती खिळली शेजेतें
आज सकाळीं उठुनि पहातें
गेलि तों आई !”

तूं नि मीच ना सारीं इथलीं
खिडक्या दारें नीट लाविलीं !
वाट कशी मग तिला मिळाली !
जावि कशि बाई ?”

“ आजकाल मीं हट्ट न केला
रडलें नाहीं—ठाउक तुजला
तिनें बरोबर मग कां मजला
घेतलें नाहीं ?”

## मालविका

" आई कुठें गेली असतांना
उगी करावें तूंच मला ना !
आईसाठीं तूंच मग पुन्हां
रडसी कां ही ?"

" भाउलि माझी तूंच फोडली
चिमणी माझी तूंच हरवली
अगे लबाडे ! तूंच लपवली
कुठेंतरि आई !"

" बरें बरें, जरि खाऊ न दिला
घेच ताई, तरि गोडगोडुला
पापा माझा दोन्हीकडला !
दाव परि आई !"

कवटाळुनि छकुलीला पोटीं
किती शहाणी ताई मोठी
होउनि छकुली वेडि धाकुटी
रडली धाई !"

—रा. अ. काळेले.

## ५० "बोल बोल बाला!"

कां चिमण्या रुसला, मूक जाहला ?
बोल बोल बाला!! ध्रु.

बोल बाला एक बोला
हांस हंसऱ्या! एक वेळा
सोडी रे रुसवा, दावी हंसरा
मुखशशि, विनवि तुला.

माय अंकावरुन तुजला
आणिलें मीं ह्या स्थळाला
हा म्हणुनि अबोला, बाला धरिला
वाटतसे मजला.

प्रेमपान्हा पाजुनीया
माय निजवी गाउनीया
दचकेल म्हणोनी येई फिरुनी
पाहण्यास बाला.

अदय परि मी ह्या स्मशानीं
ठेवितों रे तुज सख्या मीं

मृत आशा माझ्यासंगें तुझ्या
रक्षितील तुजला.

परत कैसा जाउं आतां
माय तूझी मज पहातां
येईल घ्यावया बाळा तुजला
सांगूं काय तिला !

—कृष्णाबाई वैशंपायन

---

## ५१ कुन्द-कलिका—

[ आपल्या सर्वांत लहान मुलीच्या दांतांमध्यें एक लहानसा दांत आलेला पाहून आई आपल्या वडील मुलीस म्हणते ]

बोलुं नको ग ! सोनुकलीला !
मोहवि मोहक बालक-लीला ध्रु.

अधर-पल्लवान्तरिं ज्या लपती
सर्वहि निर्मल कलिका दिसतीं.
कुंदकळ्या या काय विकसती !
बघ बघ बघ या बाल-कलीला !

गगन-तारका मुखिं कीं लपती
इवली ही जणुं काय अरुंधति
चमचम चमके कशि बघ, बघ, ती
लागेलच कीं दृष्टच हिजला !!

—रा. वा. पंतोजी.

## ५२ माझा बाल राजा—

( अभंग. )

ओढितसे मन, माझा बाळराजा,
हात कामकाजा, वळेची ना.
पहांटेची वेळ, सामसूम सारी,
झोंप डोळ्यावरी, आमचीया.
खिदळतो तेव्हां, बाई हा जागून,
खेळवितें कोण, कळेचिना.
हुंकार देऊनी, हंसे, खेळे, रंगे,
कोण याच्यासंगें, गोष्टी करी ?
उडूनियां धुंदी, वृत्ती उभयांच्या
मुखीं राजसाच्या लीन होती.

उसळतें सौख्य, नसानसांतून,
निघतें वाहून नेत्रांवाटे.
अहा ब्रह्मानंद, बाई त्यावेळचा,
मुखें वर्णायाचा कोणी कसा !
म्हणती पहांट, अमृताची घटी,
केंवि होइ खोटी, श्रेष्ठ उक्ती.

## मालविका

कोंवळीं किरणें, रवीचीं ओढीतो,
काय उडवीतो, पतंग हा ?
चंद्रबिंबाकडे, उंचावितो हात,
चेंडू आकाशांत, झोंकी काय ?
गोड याचे बोल, अमृताचे घोंट,
विसरते पोट, क्षुधा तृषा.
याचें स्मित माझ्या, जिवाची उमेद
सुख दुःख भेद, नुरवीच.
याच्या रूपगुणीं, हरपतें भान,
लोपतें मीपण, सर्व माझें.

माझा पंचप्राण आत्म्याचें जीवन
कोठें हा जपून, ठेवूं तरी ?
विश्वंभरा तुला, असे कारे ! आई ?
कोण तुझ्या पाही, कौतुकाला ?
सर्वस्वाचें सार, बाई ! बाळ माझा;
कशासाठीं दूजा पूजूं देव ?

—सी. का. देव.

## ५३ सदाफुली—

( एका नेहमीं हंसणऱ्या लहान मुलीस उद्देशून आई म्हणते. )

किती निलाजरी
सदाफुली परी
सतत हंसत फिरत पोर गोड गोजिरी !

दंव पडो किती
उन्हाचि ना भिती
हंसत डुलत दिसत बाल-वेलिच्या परी !

स्वैर झुलुकशी
वाजवी शिटी
कुहू कुहू करीत गोड कोकिलेपरी !

द्वाड कारटी !
फार कोडगी !
कांहिंही म्हणा, परी न कांहिं तिज तरी.

—रा. वा. पंतोजी

## ५४ "तुम्हींच घ्या पाहुनि तुमचें !"

भिन्न अभिरुची भिन्न जनांची बीज भिन्नपण विश्वाचें
भिन्नपणाला अभिन्न करितां सरतें मुळिं कारण त्याचें.

रविच्या उदयें कुणी हर्षती कोणी गिरिकंदरिं लपती
बिंब रवीचें कुणी लक्षिती, कोणाचे डोळे दिपती.

रम्य शशिकला शीतल सकलां, कुणां गमे अग्निज्वाला
मनस्कतेची सारी लीला रंग चढे तो दृष्टीला.

रत्नपारखी रत्न जाणती रत्नाची महती गाती
तेंच मर्कटांहातीं पडतां तीं त्यांचीं शकलें करितीं.

मोल गुणाचें करितां होतें मोल मनाच्या संस्कृतिचें
कनिष्ठ वा उत्कृष्ट काय तें तुम्हींच घ्या पाहुनि तुमचें !

× × × ×

निजला ब्रह्मा प्रलयकालिं तो स्फूर्तीनें जागा झाला
ॐकाराचें काव्य प्रसवला ती झाली सृष्टी बाला.

कुठें सरलता कुठें चपलता कुठें क्रुद्ध अति गंभीर
नीपवृक्ष नभ प्रेमलता सुम सर्व मनोहर चराचर.

तीच एकली अनेक रूपें नटलेली दिसली जेव्हां
आश्चर्यानें पाहुं लागला चहूंकडे ब्रह्मा तेव्हां.

हृदयावरती हात ठेविला वृत्ति मिळविली वृत्तींत
तों स्फूर्तीच्या धारा त्याला दिसल्या त्याच्या हृदयांत.

हृदयाचें प्रतिबिंब सृष्टिमधिं सृष्टि हृदीं भासें त्यातें
हृदयरंगिं रंगोनि स्फूर्ति त्या रंगिं सृष्टिला रंगवितें.

तेव्हां झाला विलीन ब्रह्मा निज कविता-गानीं रमला
जनता म्हणते पिसाट ब्रह्मा पहा भाळला कन्येला.

"धरितां धरवे न ओक तैसा लोक" सत्य वच तुकयाचे
कनिष्ठ वा उत्कृष्ट काय तें तुम्हींच घ्या पाहुनि तुमचे !

× × × ×

हृद्रस झिरपति वैखरिमधुनी व्यक्तरूप कविता त्यांचें
किंवा कविता पुष्प म्हणावें कविहृदयाच्या वेलीचें.

या पुष्पांनीं वाग्देवीचें कसें तरी पूजन करितों
"कसें तरी" हें प्रिय देवाला, मी माझा अनुभव कथितों.

तुलसिदलाला बिल्वदलाला नाहीं सुंदरता, वास
वास तया परि प्रभुचरणावरि प्रिय त्रिभुवनीं देवास.

## तुम्हींच घ्या पाहुनि तुमचें

कसें तरी गगनांत विहरुनी मेघ दाविती मजा जना
रवि-किरणांचें रंग भरोनी रेखुनिया चित्रें नाना.

निष्कर्मांचें कर्म असे हें नांव न यामधिं वांच्छेचें
कनिष्ठ वा उत्कृष्ट काय तें तुम्हींच घ्या पाहुनि तुमचें !

–रा. दौ. गडकरी

## ५५ अनामा प्रवासी—

नव नवलानें परिचय सांगा म्हणतां.
कां नांव नव्याचें पुसतां ?
जीं काळानें अवचित सुमनें खुडलीं
हातांत विधीच्या दिधलीं
तद्‍हृदयाच्या सुप्त वेदना आशा
मी त्याची नीरव भाषा
त्या भाषेची रसमूर्ती
जीवांची पुनरावृत्ती
जीव तेच भाषा होती
गूढार्थातें उकलिति येतां जातां.
कां नांव नव्याचें पुसतां ?

रसरसलेलीं किरणें कोठुनि आलीं ?
अरुणाला लाली चढली.
रवि येवोनी पसरी करजालातें,
परी उषा पदर सांवरिते.
उत्सुकतेनें कलिका करिती साज
त्यास जो देत ऋतुराज.

हें रहस्य तो जाणील
जो स्वयें तेंच होईल
जीवांत विश्व पाहील
आश्चर्यानें स्थगित होउनी बघतां
कां नांव नव्याचें पुसतां ?

जरि नाहिं तुम्हां यांत वाटतो राम
नावाशीं कसलें काम ?
कुठला आला परिचय या निःसंगा ?
तुम्हीच कोण तें सांगा ?
या स्थानाचें धनी तुम्ही म्हणवीता
तुम्हांस सर्व जाणिवता
मी भटक्या, विरहितधाम
पाहिजे क्षणिक विश्राम
दोन शब्द देइन दाम
निशिं राहोनी उद्यांच जाइन परता
कां नांव नव्याचें पुसतां ?

—रा. दौ. गडकरी.

## ५६ वादळांत सांपडलेली गुराखीण—

डोईस दुधाची चरवी आणिक लोणी,
वादळीं सांपडे गुराखीण वनराणी.

ती गव्हाळ कांती, नेत्र सशाचे भोळे,
नाचती कपोलीं केसहि काळे काळे.

फडफडे ओढणी पिंवळी, कुंकुम भाळीं,
ही मौज बघाया जमे ढगांची टोळी.

नसनसीं सांठली तिच्या नवी मधुज्वानी,
कोसळे वरोनी धो, धो; धो, धो; पाणी.

दातांत तिच्या हुडहुडी, मुखावर लाली,
वृक्षावर हलते जास्वंदाची जाळी.

मेघांतुन कोणी तिजला 'गारा' हाणी,
तुडवीत चालली पायीं ओहळपाणी.

हृदयांत तिच्या गुंजते प्रीत-बांसरी,
पवनाची 'भिर भिर' सांथ तियेला करी.

—गोविंद झोकरकर.

## ५७ माळवीण—

डोंगरखडकांमधून जाते तरणी—ताठी पोर
पारधिणीची फन्दफितूरी विलोलनयनीं घोर.

झाड-पालवी हलवी तोडी
कुठें दण्डुकीं जमीन झोडी
रेंखिव अंगलटीवर साडी
जास्वन्दी, खाडि स्वच्छ पांढरी, कृष्ण किनारी मोर.

ओहळांत पद बुचकुळ करिती
ओढ्यामाजीं आंग धुई ती
निथळत वरती ये ओलेती
शेतकऱ्याची हंसरी छोरी लोचन भ्रमरी भोर.

मनगटांवरी कडी रुपेरी
दातांची शोभा चंदेरी
नच भिल्लिण माळवीण गोरी
ठकवी गालीं छटा भांग मुखिं डुले रुपेरी बोर.

## मालविका

कृश कम्बर विक्षेप कमाली

कुणास हांसत बोलविं गाली

चुकवाचुकवी अमुच्या भाळीं

अखेरीस हुरळल्या जिवाचें दुखी सुख, इन्दोर.

—भालचंद्र लोवलेकर.

---

## ५८ कवितेंतुनि—

( चाल - नृपममता; अंतरा वगळून )

अप्राप्य वस्तु जगतींच्या
कवितेंतुनि कल्पायाच्या केवळ ध्रु.

फूल गुलाबाचें हंसतें
कोणास तें न आवडतें ! विकसित.

परक्यांच्या उद्यानींचें
कवितेंतुनि वर्णायाचें केवळ.

भगण तो नील व्योमींचा
जणुं हलवा संक्रांतीचा पसरला.

परि कुणि न कुणा देण्याचा
कवितेंतुनि कल्पायाचा केवळ.

पाळणा नील गगनाचा
शशि-रविचा कल्पायाचा केवळ.

गे त्यास गीत अंगाई
गायाचें कवितेंमधुनी कल्पने.

## माळविका

कादंबिनि काळि कभिन्न
तरलिनी तींत ती वीज शोभिनी.

परि कुणि न करीं धरण्याची
कवितेंतुनि नटवायाची केवळ.

स्वर्गंगा गगनीं वसते
न कुणाला स्वर्गा नेते मज्जनें.

सुरलोक जरी तिज मानी
कवितेंतुनि मर्त्य जनांनीं– गाविती.

आकाशपुष्पसम जगतीं
वस्तु हेतु कीं जे असती ईश हे.

त्यांनीं न शांति भंगूं दे
कवितेंतुन पण गाऊं दे. केवळ.

–सौ. शांताबाई पाटेकर.

## ५९ देव का मर्त्य ?

( सुनीत. )

होती रम्य अवंति ती परि अतां वाटे मुळीं ना तशी,
शंभू तेथिल, बोलुं काय पण मी त्या कालनाथाविशीं.
जातों उज्जनिला तथापि, करितों ईशाचिया दर्शना,
वेडें हें मन घेइ धांव तिकडे सांगूं कुणां कारणां.

ज्या देहांत नितांत कांत शुचि तो आत्मा सुखें खेळला,
त्याचे रेणु अवंतिकेंत विरले, संपन्न केलें तिला.
ज्या श्वासें प्रतिस्पंदनीं मम गृहीं सौख्याब्धि हेलावला,
अंतीं भारुनि वायु त्या नगरिचा तेथेंच तो थांबला.

घेतों दर्शन ठेवुनी शिर महाकाळेश्वराच्या पुढें,
ती त्यातें भजली म्हणूनचि परी मच्चित्त स्वांतीं कढें,
होतां स्तंभित शंभुभालिं बघुनी शुभ्रा विभूती तिची,
हा ! हा ! भक्तजनांचिया हर ! चिताभस्मींच कांहो रुची.

प्रेमाची जरि राख चर्चुनिहि ये दिव्यत्व देवादिकां
ज्याच्या तें हृदया जिवंत भजलें तो देव का ? मर्त्य का ?

–सी. का. देव.

## ६० प्रीति—

( सुनीत. )

जा सांगा जगतास कीं मजहुनी पापी नसे ह्या वनीं
गेले बंध तुटोनिया, मज अतां भीती कुणाची मनीं ?
गावो कोणि सदा स्तुतीस अथवा निंदोत कोणी सुखें
जो जाणें जगिंचे जगत्पति कृती पाहो सुखें कौतुकें.

आली झोंप हिला म्हणोनि शिर मीं अंकावरीं घेतलें
पाहोनी अतिशुद्ध भाव मनिंचे प्रेमें मुखा चुंबिलें
कोणी कांहिं म्हणो मनांत अपुल्या, प्रीती मनीं जागते
प्रीतीला रमण्यास शुद्ध मनिंची प्रीती सदा लागते.

झालें मीलन प्रीतिचें हृदयिचें भिन्नत्व पावे लय
घ्यावें सौख्य परस्परांस जगतीं केला असा निश्चय
नाहीं भाव दुजा मनांत अमुच्या विश्वास दोघांसही
ही बाला मजला म्हणो निशिदिनीं 'माई' असें आस ही

ऐसी प्रीति पवित्र शुद्ध असतां कां बंधनें ही मला ?
जा! हांसा मजला, नका परि हंसू माझ्या कुणी प्रीतिला.

—कृष्णाबाई वैशंपायन.

## ६१ अध्यात्म–प्रसाधन—

नखशिखांत तनू सगळी तुम्हां
तिजमधें जगतीत्रयजीवना !
उघडुनी हृदया निज बाहते
पद सुमंगल अंतरिं मागते.

अमर निर्जर-जीवन-निर्झरा !
अतुल-सिद्धिसमृद्धि-सुखाकरा !
सकल-वैभव-बोध-बलोदधे !
उदित व्हा हृदिं दीन-दयानिधे !

—तारानाथ वैद्य.

## ६२ स्वांत-कमलिनी—

नियमनें प्रभुच्या मज मीलन
घडतसे, सखया ! परि मन्मन—
तुजनिमित्त सदा उघडें असे
सतत तूंच तयांत सुखें वसें.

जसजसा रवि जाइ घराकडे
तसतसें मन जाइ तुझ्याकडे;
जरि न येशिं रवी घरिं गेलिया
तळमळे न पडे मग चैन या.

स्ववश जोंवरि हें मज थांबणें
तव न वाट चुके कधिं पाहणें;
स्ववशता परि हातुनि गेलिया
बळ न कांहि चले मग केलिया.

जिवलगा ! थकते जरि यापरी
मिटुनि घे न पुटें सगळीं तरी,
क्षण विलंब न हो तुज आलिया
म्हणुनि ठेवितसे स्फुट पाकळ्या.

—तारानाथ वैद्य.

## ६३ पूर्णाहुती—

( राग—भैरव, ताल—झपताल. )

जीवनाध्वरिं पडे आज पूर्णाहुती
येइ अंत्येष्टि घटि, आज झालों कृती.        ध्रु.

कर्मभूमीवरी अवतरुन जी करी
सकल कर्में ‘ हवी ’ आज होवोत तीं.

कोणि आणूं नका आसवें लोचनीं
छे ! न ही शून्यता ! पूर्णता, सद्गती.

आज वीणेवरी, भगवती शारदा
साममंत्रावली, स्वैर आलापुनी—

आज षड्दर्शनें मूर्त येवोनिया
वेदघोषें भरुत सवन भूमीप्रती.

शंख-घंटादिकीं नाद घुमवा अतां
चौघडा द्या झडूं, या करा आरती.

आज पुष्पांजली स्थंडिलीं अर्पुनी
स्वस्तिवचनीं करा सांगता सिद्धि ती.

—भा. रा. तांबे.

# परिशिष्ट [ अ ]

## कवि-परिचय.

१ श्री. अडोणी—यांचें पूर्ण नांव दामोदर लक्ष्मण अडोणी. यांचा जन्म २० एप्रिल १९१४ रोजीं वणी ( जि. यवतमाळ ) येथें झाला. हे आनंद कॉलेज, धार मधून १९३५ मध्यें इंटर होऊन हल्लीं हिस्लॉप कॉलेज मधें बी. एच्या वर्गांत शिकत आहेत. यांच्या कांहीं कविता ' शालापत्रक ' ' आनंद ' ' विश्ववाणी ' इत्यादि मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

२ श्री. आपटे—यांचें पूर्ण नांव विनायक हरी आपटे हें असून, जन्म पांचवड ( ता. वाई, जि. सातारा ) येथें वैशाख वा। १३ शके १८१४ रोजीं झाला. शिक्षण बहुतेक इंदुरांत झालें असून हल्लीं हे मालव साहित्याचे संपादक आहेत.

३ श्री. करकरे—यांचा जन्म मंदोसर ( ग्वाल्हेर ) येथें १९१० त झाला. यांचें बहुतेक शिक्षण ग्वाल्हेर स्टेट मधेंच झालें. हे पुढें इंदूर कॉलेजांतून एल् एल्. बी. होऊन हल्लीं मुरार येथें वकीली करीत आहेत. हे हिंदीचेही चांगले कवि व लेखक आहेत.

४ श्री. कवचाळे—यांचें पूर्ण नांव कृष्णाजी गंगाधर कवचाळे हें आहे. यांचा जन्म देवासमध्यें माघ कृ. १ शके १८२३ रोजीं झाला. शिक्षण देवाशांत झालें. यांचा साहित्य-व्यासंग बराच असून यांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत–[१] श्री दत्तपदामृतपंचपदी (१९१८), [२] गीत गोविंद (१९२०)–स्वतंत्र काव्य,

[३] देवास येथील मराठी साहित्य व साहित्य सेवक (१९२६), [४] स्मरणी (१९२७)–शंकराचार्यांच्या परापूजा काव्याधारें, [५] माळव्यांतील प्राचीन विद्वद्रत्नें, भाग पहिला (१९२८), [६] गीता-प्रबोधन (१९३०), [७] गीतेच्या कांहीं प्रमुख श्लोकांचें भाषांतर–पद्य.

यांच्या ग्रंथांवर विविधज्ञान विस्तार, आनंद, केसरी, महाराष्ट्र, जागृति , सहविचार , आत्मबोध , चित्रमयजगत् , मार्तंड , मधून अभिप्राय आलेले आहेत. यांच्या कविता मासिकांतून प्रसिद्ध होत असतात.

हे हल्लीं 'सेक्रेटरी ज्युडिशियल मेंबर' देवास(सीनियर)येथें आहेत.

५ श्री. **काळेले**—यांचें पूर्ण नांव रामचंद्र अनंत काळेले ( श्यामल ) हें असून जन्म १९०७ मुा. सेन्धवा [ संस्थान इंदूर ] येथें झाला. ह्यांचें सर्व शिक्षण इंदुरांत झालें असून हे बी. ए., एल् एल्. बी. व काव्यतीर्थ, आहेत. यांचा 'वाग्वसंत' नामक कवितासंग्रह [ सं. १९९१ ] प्रसिद्ध झाला आहे. त्यावर अभिप्राय केसरी, नवाकाळ इत्यादि प्रसिद्ध पत्रांतून आले आहेत. यांच्या कविता निरानिराळ्या मासिकांतून येत असतात. हल्लीं हे खरगोण ( इंदूर ) मध्यें कोर्ट इन्स्पेक्टर आहेत.

६ श्री. **कुळकर्णी**–यांचें पूर्ण नांव यशवंत खंडेराव कुळकर्णी. यांचा जन्म आश्विन शु॥. पौर्णिमा सन १८९२ ई.मधें इंदुरांत झाला. हे बी. ए. असून यांचें सर्व शिक्षण इंदुरांत झालें. यांनीं ' मानस निष्यंद ' नामक आपला कवितासंग्रह प्रसिद्ध केला आहे [ १९३२ ] व त्यावर ' केसरी ' ' महाराष्ट्र ' ' लोकशिक्षण ' ' आनंद ' व ' चित्रमयजगत् ' मधून अभिप्राय आले आहेत. हल्लीं हे महू येथें शिक्षक आहेत.

७ **श्री. केळकर**–यांचें पूर्ण नांव नारायण वासुदेव केळकर आहे. यांचा जन्म नूराबाद [ ग्वाल्हेर ] येथें ५ मार्च १९०५ रोजीं झाला. यांचें बहुतेक सर्व शिक्षण ग्वाल्हेरींतच झालें. यांनीं 'सौंदर्य-मीमांसा' [ १९३२ ] व 'रसाचे तीन घट' हीं लहान पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. हल्लीं हें ग्वाल्हेरच्या पोस्ट खात्यांत इन्सपेक्टर आहेत.

८ **श्री. गडकरी**–यांचें पूर्ण नांव राजाराम दौलत गडकरी हें आहे. यांचा जन्म १८८७ जून मधें पनवेल येथें झाला. यांचें शिक्षण उमरावतीस झालें. अलीकडे २० वर्षांपासून हे मध्यहिंदुस्थानांतच आहेत. यांनीं लहान लहान पुस्तकें बरींच प्रसिद्ध केलीं आहेत. काव्यः– (१) शिवकार्य (२) धर्मकार्य (३) उत्सवकार्य (४) लाङ्गूल कार्य इ. गोष्टी–(१) मंगळगौरीचा प्रसाद (२) गाईनें राखिलें इ. नाटकें (१) शरयूशिवाजी (२) भाक्तिवात्सल्य इ. यांच्या कविता बहुतेक सर्व प्रसिद्ध मासिकांतून आल्या आहेत व त्यावर अभिप्राय आले आहेत. हें हल्लीं उज्जयिनींतच असतात.

९ **श्री. झोकरकर**–यांचें पूर्ण नांव गोविंद लक्ष्मण झोकरकर हें आहे. यांचा जन्म देवास [सीनियर] येथें ता. २१ आगस्ट १९१२ रोजीं झाला. यांचें शिक्षण देवास व ग्वाल्हेरींत झालें. यांनीं 'मंजरी' नामक काव्यसंग्रह (१९३१) प्रसिद्ध केला आहे व बहुतेक सर्व प्रसिद्ध नियतकालिकांतून त्यावर अभिप्राय आले आहेत. यांचीं कवनें सर्व मासिकांतून प्रसिद्ध होत असतात. हे हल्लीं देवासमध्यें शिक्षक आहेत.

१० **श्री. डांगे**–यांचें पूर्ण नांव केशव नारायण डांगे हें आहे. यांचा जन्म उज्जयिनी येथें ता. ४ फेब्रुवारी १९०२ रोजीं झाला. हे एम्. ए., बी. टी. असून यांचें शिक्षण उज्जयिनी, इंदूर व बनारस येथें झालें. यांनीं 'सांख्यकारिकांचें भाषांतर' प्रसिद्ध केलें आहे. यांच्या

कविता व लेख बऱ्याच नियतकालिकांतून येत असतात. हे हल्लीं मंदोसर [ ग्वाल्हेर ] मध्यें शिक्षक आहेत.

११ श्री. तांबे—कविवर्य भास्करराव रामचंद्र तांबे यांचा जन्म ‘ मुंगावली ’ [ ग्वाल्हेर ] येथें १८७४ त झाला. यांचें प्रारंभिक शिक्षण देवासमधें झालें व उच्च शिक्षण इंदुरांत सुरू झालें. पण परिस्थितीमुळें त्यांना लवकरच शिक्षण सोडावें लागलें. त्यांच्या कविता बहुतेक सर्व नियतकालिकांतून आल्या आहेत, व दोन भागांत त्यांचा कविता-संग्रहही प्रसिद्ध झाला आहे. त्यांचें बरेच लिखाण मित्रांच्या बेजबाबदारपणामुळें दुर्दैवानें अजिबात गहाळ झालें. त्यांच्या कवितांवर व भावपूर्ण म्हणण्यावर निरनिराळ्या लेखकांनीं आपले प्रशंसापर उद्गार काढले आहेत. त्यांना आज ६१ वें वर्ष चालूं आहे. ते हल्लीं ग्वाल्हेर संस्थानांत शिक्षण खात्यांत रजिस्ट्रार आहेत.

१२ श्री. देव—यांचें पूर्ण नांव सीताराम काशीनाथ देव हें आहे. यांचा जन्म सन १८९२ त धारमधें झाला. यांचें शिक्षण धार व इंदूर [ इंटरआर्ट्स ] मधें झालें. यांच्या कविता वेळोवेळीं मालव-साहित्य, मल्हारीमार्तंड, केसरी व आनंद यांत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांना १९२६ मध्यभारतीय कविसम्मेलनांत इंदूर-साहित्यसभेतर्फे रौप्य-पदक मिळालें आहे. हल्लीं हें इंदुरांत शिक्षक आहेत.

१३ श्री. निरखे—यांचें पूर्ण नांव गोविंद यशवंत निरखे हें आहे. यांचा जन्म २१ जुलै १९१६ रोजीं झाला. यांचें शिक्षण ग्वाल्हेरींत झालें असून हे धार कॉलेजांतून नुकतेच इंटर झाले आहेत.

१४ श्री. सौ. पाटकर—यांचें पूर्ण नांव सौ. शांताबाई पाटेकर [ कु. दुर्गाबाई क्षीरसागर] हें आहे. यांचा जन्म १६-६-११, इंदूर येथें झाला. या बी. ए. असून यांचें शिक्षण इंदुरांत झालें आहे.

१५ श्री. पेंढरकर—यांचें पूर्ण नांव बाळकृष्ण नारायण पेंढरकर हें आहे. यांचा जन्म चौराह [ संयुक्तप्रान्त ] येथें २९ जुलै १९०८ रोजीं झाला. हे बी. ए. असून यांचें शिक्षण ग्वाल्हेर, झांशी, उज्जयिनी व इंदूर येथें झालें आहे. यांच्या कविता ' मालव साहित्य ' ' हित-चिंतक ' ' प्रभात ' या मासिकांतून प्रसिद्ध होत असतात. हल्लीं हे इंदुरांत फायनल लॉ व एम्. ए. चा अभ्यास करीत आहेत.

१६ श्री. पंडित—यांचें पूर्ण नांव गजानन नरहर पंडित हें आहे. यांचा जन्म इंदुरांत ता. १८ जानेवारी १८९८ रोजीं झाला. ह्यांचें उच्च-शिक्षण इंदुरांतच झालें आहे. हे ' विदर्भ-वीणा ' विदर्भीय प्रसिद्ध काव्यसंग्रहाचे संपादक आहेत. हे हल्लीं ग्वाल्हेर स्टेट रेव्हेन्यू खात्यांत आहेत.

१७ श्री. पंतोजी—यांचें पूर्ण नांव रामचंद्र वामन पंतोजी हें आहे. यांचा जन्म सन १८९३ त ग्वाल्हेरींत झाला. हे एम्. ए. असून यांचें शिक्षण ग्वाल्हेरींत झालें. यांच्या कांहीं स्फुट कविता ' मालवसाहित्य ' ' केसरी ' ' आनंद ' ' शाला पत्रक ' ' चित्रमय-जगत्' मधून प्रसिद्ध झाल्या आहेत. हे हल्लीं माधव कॉलेज उज्जयिनींत लेक्चरर आहेत.

१८ श्री. बोकील—यांचें पूर्ण नांव बाळकृष्ण रामचंद्र बोकील असून यांचा जन्म ग्वाल्हेरींत मार्गशीर्ष शुद्ध २ संवत् १९३३ रोजीं झाला. हे एम्. ए. असून यांचें शिक्षण ग्वाल्हेरींत झालें. यांनीं [१] कमलिनी [ १९०७ ], [२] रुक्मांगद-मोहिनी [ १९१६ ] हीं नाटकें लिहिलीं असून यांच्या कविता विशेषतः ' मासिक मनोरंजन ' व ' करमणूक ' मधून प्रसिद्ध झाल्या आहेत. हे पूर्वी ग्वाल्हेरींत कॉलेजांत प्रोफेसर होते, हल्लीं सेवानिवृत्त होऊन सेंट्रल लायब्ररींत ऑ. सेक्रेटरीचें काम करीत आहेत.

१९ **श्री. माचवे**—यांचें पूर्ण नांव प्रभाकर बळवंत माचवे हें आहे. यांचा जन्म ग्वाल्हेरींत २६ डिसेंबर १९०७ रोजीं झाला. यांचें शिक्षण रतलाम व इंदूर येथें झालें असून हे बी. ए. आहेत. यांची मराठी कविता मुख्यत: काव्यरत्नावलींतून प्रसिद्ध होत असते. हे हिंदीचेही चांगले कवि आहेत व हिन्दी प्रमुख नियतकालिकांतून यांची कविता प्रसिद्ध होत असते. हे हल्लीं आग्र्यास एम्. ए. व लॉ चा अभ्यास करीत आहेत.

२० **श्री. रहाळकर**—महाराष्ट्रास सुपरीचित असलेले नरहर शंकर रहाळकर यांचा जन्म 'भडगांव' येथें २० डिसेंबर १८८२ रोजीं झाला. १९०४ पासून यांचें वास्तव्य माळव्यांत विशेषतः इंदुरांत आहे. हे उज्जयिनींतील कॉलेजांतून बी. ए. झाले. ह्यांच्या कविता 'मनोरंजन' 'प्रभात' 'काव्यरत्नावली' इ. मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. व त्या त्यांनीं स्वतंत्र 'पुष्पांजली' नांवानें प्रसिद्ध केल्या आहेत. त्याशिवाय त्यांनीं कांहीं ग्रंथांस प्रस्तावना लिहिल्या आहेत. ते चांगले प्रसिद्ध टीकाकार आहेत. 'केशवसुतांची कविता' हा त्यांचा टीकाप्रबंध सर्वपरिचित आहे. त्यांनीं 'मानाजीराव' आणि 'सं. उत्तरराम चरित्र' हीं दोन नाटकेंही लिहिलीं आहेत व त्यांच्या कांहीं लघुकथा करमणुकींतून प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांनीं इंदुरास मोठमोठीं कामें केलीं असून हल्लीं ते कस्टमकमिशनर आहेत.

२१ **श्री. लोवलेकर**—पूर्ण नांव भालचंद्र राजाराम लोवलेकर आहे. यांचा जन्म सन १९११ आक्टोबर रोजीं कन्नोद मुक्कामीं झाला. हे बी. ए. असून यांचें शिक्षण खरगोण, गरोठ, उज्जयिनी व इंदूर येथें झालें आहे.

२२ श्री. वैद्य–यांचें नांव तारानाथ वैद्य हें आहे. यांचा जन्म माघ वद्य ८ संवत् १९३४ रोजीं झाला. ह्यांचें शिक्षण मुख्यतः देवास-इंदूरमध्यें झालें. यांनीं 'ब्रह्मजन्म' 'विद्याशास्त्राचे अथेति' 'विद्याशास्त्राचें इदमित्थम' 'वैदिकसंदेश आणि आदेश' 'श्रीमंतांची यशोमूर्ति' इ. लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत.

२३ श्री. वैशंपायन–यांचें नांव कृष्णाबाई वैशंपायन. यांचें जन्मस्थान ग्वाल्हेर व शिक्षण हिंगण्यास झालें. यांच्या कांहीं कविता 'रत्नाकर' 'मधुकर' 'यशवंत' ह्यांत प्रसिद्ध झाल्या आहेत. हल्लीं ह्या सें. हिं. बालिका विद्यालयांत अध्यापिका आहेत.

२४ श्री. शिंत्रे–यांचें पूर्ण नांव दामोदर वासुदेव शिंत्रे [विलय] हें आहे. यांचा जन्म बढवाय [इंदूर] येथें १७ जानेवारी १९१६ रोजीं झाला. यांचें शिक्षण उज्जयिनी व इंदूर येथें झालें. हल्लीं हे पुण्यास शिकत आहेत.

२५ श्री. सौ. सोहनी–यांचें नांव श्री. सौ. इंदिराबाई सोहनी आहे. यांचा जन्म मन्दोसर येथें संवत् १९६१ मध्यें झाला. यांच्या कांहीं कविता हितचिंतकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

# परिशिष्ट ( ब ).

## ' मालविकेंतील ' कवितांच्या पहिल्या ओळींचें

## सूचि-पत्र.